याविषयीं रामदासस्वामींची एक गोष्ट आहे ती अशीः– एकदां रामदासस्वामी एकदोन शिष्यांसहित ग्रामांत राहून सज्जनगडास येत होते तेव्हां वाटेंत शेतांतून जोंधळ्याचीं पिकें होतीं तीं त्यांच्या दृष्टीस पडून ते शिष्यांस म्हणाले -या शेतांत हुरडा चांगला दिसत आहे. आणि आपल्यांस क्षुधा लागली आहे. याकरितां यांतून दहापांच कणसें घेऊन येथेंच भाजून आपण खाऊं. असें गुरूजींचें वाक्य ऐकून शिष्यांनीं कांहीं कणसें तोडलीं, आणि तेथेंच विस्तव करून कणसें भाजीत आहेत. तोंच तो शेतकरी फिरत फिरत तेथें आला. आणि पाहतो तों आपले शेतांतील त्यांनीं कणसें तोडलीं आहेत. आणि तीं भाजण्याचा क्रम चालू आहे हें पाहून तो अडाणी व दांडगा शेतकरी अतिशय रागावला. मग त्या आवेशांत त्याला अगदीं विचार न राहतां त्यानें गोफणीच्या चऱ्हाटानें प्रथम गुरुजीस व नंतर शिष्यांस चार चार तडाखे मारले. त्यावेळीं रामदासस्वामींनीं त्या दुष्ट शेतकऱ्यास कांहीं दुरुत्तरानेंसुद्धां निषेध न करितां त्यानें आपल्या जिव्हालंपटपणामुळें केलेली शिक्षा उपदेशतुल्य मानून शिष्यांसह तेथून निघून सज्जनगडाचा मार्ग धरिला. पुढें सज्जनगडास स्वामी पोंचल्यानंतर गुरुवारीं शिवाजी राजा हा सद्गुरु दर्शनास आला. त्यानें षोडशोपचारें गुरुपादपूजन करून हात जोडून उभा राहिला. त्यावेळेस स्वामींनीं ज्यापासून आपल्याला उपदेश मिळाला त्या शेतकऱ्याचा पत्ता सांगून त्यास आणण्याविषयीं राजास आज्ञा केली. शिवाजीच्या मनांत महाराज मार्गानें येत असतां त्यानें कांहीं सेवा केली असेल म्हणून त्यानें त्या शेतकऱ्यास बोलावण्याकरितां शिपायांस पाठविलें. त्यावेळीं शिष्यांच्या मनांत ती गोष्ट शिवाजी राजास कळविण्याविषयीं घोळत होती. परंतु समर्थांनीं मार्गांतच आज्ञा केली होती कीं, ही गोष्ट शिवाजीच्या कानावर अगदीं घालूं नका. त्यामुळें त्यांचा उपाय चालेनासा झाला. इकडे शिपायांनीं त्या शेतकऱ्यास राजाज्ञा कळविली कीं, स्वामी महाराजांच्या आज्ञेवरून तुला सरकारांनीं बोलाविलें आहे. तेव्हांमात्र त्या शेतकऱ्याचे मनांत धस्स होऊन त्याला गोफणीनें भगवे वस्त्रांच्या बावास मारल्याची आठवण झाली. परंतु कु-

रतो काय, राजाज्ञा अनुल्लंघनीय आहे असें जाणून तसाच सभयांतः करणानें त्या शिपायाबरोबर सज्जनगडास आला. शिपायांनीं राजास कळवतांच राजा हात जोडून म्हणाला. महाराज, तो शेतकरी आला आहे. काय आज्ञा असेल ती दासास कळवावी. स्वामींनीं त्यासजवळ येण्याविषयीं सांगितलें. शेतकरी जवळ येऊन पाहतो तों तेच बुवा येथें आहेत. आणि राजा हात जोडून पुढें उभा आहे. मग तर काय त्याचें काळीज ठिकाणावर राहिलें नाहीं!! दे माय धरणी ठाव! अशी त्याची धांदल झाली. हें सर्व स्वामींनीं पाहून राजास आज्ञा केली कीं, जें शेत याजकडे आहे तें याला वंशपरंपरा इनाम करून दे अशी त्याला गुरूची आज्ञा होतांच मुत्सद्यांकडून सनद करविली. मोहर करण्याचे पूर्वी राजानें विचारलें कीं, महाराज, यानें काय आपली सेवा केली ती ऐकण्याची माझी इच्छा आहे. स्वामींनीं सांगितलें कीं, यानें आम्हांवर मोठा उपकार केला आहे. तो सांगण्याजोगा नाहीं. तथापी तुझा आग्रहच असल्यास तुला सांगेन; परंतु सनद पुरी करून त्याच्या स्वाधीन कर. राजानें मोहर करून सनद शेतकऱ्यास दिली. नंतर स्वामींनीं त्यास जाण्याविषयीं आज्ञा केली. शेतकऱ्यास त्यावेळेस मोठा विस्मय वाटला, व लज्जायमान होऊन स्वामींस नमस्कार करून चालता झाला. पुढें शिवाजीचा आग्रहच पडला कीं, त्यानें काय सेवा केली हें कळवावें? तेव्हां समर्थांनीं सांगितलें कीं, सेवा नव्हे त्यानें आम्हांस उपदेश केला. तो कोणता म्हणून विचारतांच स्वामींनीं आपली पाठ दाखविली. राजा काय म्हणून बघतो तों पाठीचीं सालडीं निघालीं आहेत. तीं पाहून राजानें शिष्यांस विचारलें तेव्हां त्यांनीं सविस्तर हकिकत सांगितली. ती ऐकून शिवाजी राजा त्यास कांहीं भयंकर शिक्षा केली पाहिजे म्हणून शिपायांस सांगत आहे तों समर्थांनीं त्यास निवारण करून सांगितलें. राजा हें जिव्हेंद्रिय फार दुर्जय आहे. कारण भागवतांत म्हटलें आहे "जितं सर्वं जिते रसे" म्हणजे एक रसनेंद्रिय जिंकिलें म्हणजे सर्व इंद्रियें जिंकिलीं. तर त्यानें रसनेंद्रिय जयाविषयीं आम्हांस शिक्षा केली, यांत क्रोधाचें कारण काय? असें सांगून राजाचें नि-

वारण केलें. तात्पर्य– असा अपकारी तो शेतकरी असतां त्यावररामदा-
मस्वामींनीं अशी कृपा केली कीं, त्याचें तें इनामी शेत अद्याप चालूआ-
हे. तरखरोखर जे साधु असतात ते समदृष्टि असून दयाळू असता-
त, याअभिप्रायानें शिवरामस्वामी म्हणतात॥संत दयाळू कसे०॥आ-
तां साधूंची समदृष्टीच असते; पण शरणजाणारा जर आपल्या म-
नानें त्यांचेठिकाणीं वैषम्य कल्पील आणि कांहीं कृत्रिम करील त-
र त्याचें फळ त्याचे अनुभवास येईल. अशाविषयीं परशुराम जन्मा-
ख्यान कवि निरूपण करितात.

## अथ परशुराम जन्माख्यान प्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ श्लोक ॥स्रग्धरा॥ऐका श्रोते सुगाथा कथित
सुरस जो जन्म हा भार्गवाचा॥साहित्यें युक्त बोले रस युत कविची
हे यथा मार्ग वाचा॥व्यासोक्ती आदिपर्वीं पसरलि बहुमी सांगतोंसु
रव्य सार॥गाथा संक्षिप्त येथें कथिलि निजमती सांडुनीयां पसार॥
॥१॥शार्दूल०॥वैशंपायन बोलला परिस तूं राजर्षि पारीक्षिता॥
पूर्वीं जो भृगुपुत्र कीं च्यवन जो जाला मनीं लक्षिता॥गेलें मद्वयआ-
पणास वनिता आतां असावी बरी॥ऐसें कल्पुनि कान्यकुब्जपगृहींआ-
ला ऋषी लोकरी॥२॥मालिनी॥कुशिक नृपति भावें पूजितो ब्राह्म-
णातें॥च्यवन वदत आहे मागणें आपणातें॥नरवर मग बोले का-
य आज्ञा दयाळा॥च्यवन कथित दादे त्वत्सुता दिव्य बाळा॥३॥
॥ आर्या ॥वचकुनि भूपति कल्पी कन्या द्यावी परंतु हा जीर्ण॥ना-
स्ति श्रवणें शापिल राजा चिंतांत होय संकीर्ण॥४॥पटुराय मनींक-
ल्पी ब्राह्मण हा आर्ष शीघ्र अडवावा॥कन्या देणें न घडे ऐसा सा-
रांश योग घडवावा॥५॥म्हणतो स्वामी द्यावे चारशतें श्यामकर्ण
आजि मला॥मग मी दुहिता अर्पिन हें ऐकुनि विप्र अंतरीं श्रमला॥
॥६॥श्लो०॥चामर॥विप्रधैर्य मानसें म्हणे नृपास यावरी॥श्यामकर्णअ-
श्व शीघ्र आणितों पहा तरी॥स्वाश्रमास पावला तदा च तेथ दिक्पे-

१ हे जन्मेजया. २ कुशिकराजा. ३ संशयरूक. ४ चतुर. ५ वरुण.

पती ॥ बोलवी नृपोक्ति सर्व सांगतो तयाप्रती ॥ ७ ॥ तोषला दिगीश अ-
श्वदेत चारही शत ॥ श्यामकर्ण घेउनी मुनींद्र शीघ्र पावत ॥ घे नृपा तु-
रंग दिव्य कन्यका मला दिजे ॥ विस्मित प्रभू सुताहि दे गृहास नेइजे ॥
॥ ८ ॥ लग्न लाविलें यथोक्त येतसे गृहीं मुनी ॥ राहिला सरस्वती तिरास
विप्र येउनी ॥ साधिसे वनांत दक्ष तोषला मुनिस्वयें ॥ लालनादि पा-
लनादि तो करीत निश्चयें ॥ ९ ॥ कामदा छंद ॥ यावरी हिजें साधिवा-
हिली ॥ ती कृपाभरें पूर्ण पाहिली ॥ सांगतो तिला कीं उभी रहा ॥ यो-
ग आसनीं बैसतों पहा ॥ १० ॥ वायु रोधनी विप्र बेसला ॥ तो समा-
धिचें सौख्य पावला ॥ येरि ते उभी चंपकी कळी ॥ जेवि मांडिली
काष्ठपूतळी ॥ ११ ॥ यापरी पहा वत्सरें किती ॥ खांबरें दुहे होय जो
मिति ॥ तो नऊठला ती न बैसली ॥ धन्य धन्य ते माउली भली ॥ १२ ॥
॥ शार्दू० ॥ आनंदोर्मि विसर्जिली हिजमणी पावे प्रबोधाहय ॥ तन्वी सन्मु-
रव पाहिली कृश दिसे मांसासृकाचालय ॥ वर्षे शंभर राहिली सति
उभी ही धन्य मत्कामिनी ॥ आलिंगी करुणाब्धिपाद विनयें वंदी क-
री गामिनी ॥ १३ ॥ वसंततिलका ॥ जाला प्रसन्न मुनि इच्छित मागबो-
ले ॥ सानंद तें वचन ऐकुनि शीघ्र डोले ॥ येरी वदे कुशिक तात तयासि
ऐसा ॥ व्हावा सुपुत्र कुल दीपक सूर्य जैसा ॥ १४ ॥ कांता निरिच्छ अ-
ति शुद्ध बहु प्रपन्न ॥ हें पाहुनी च्यवन होय अति प्रसन्न ॥ बोलेस-
खे तरि तुझे जननीस आणीं ॥ देतों तिलाहि तुजला सुत ऐक वाणी
॥ १५ ॥ विबुधप्रिया ॥ मंत्रुनी चरु दोन ते तधिं दाखवी सुसुखी म-
ती ॥ हा तुझा चरु हा तिचा चरु पाहने सति सन्मती ॥ जाय आपण
तेथुनी अवगाहनास नदी तरीं ॥ आणि ते जननीस ते मग कौशि-
की बहु गोमरी ॥ १६ ॥ दाखवी तव हा चरू मम हा चरू करि रक्षण
॥ स्नान मी करितें करूं दोघिही सह भक्षण ॥ जायती जननी मनों
गमलें तिचा चरु चांगला ॥ ते चरू बदली पहा किति लोभ अंतरिं
दाटला ॥ १७ ॥ पातली च्यवनांगना चरु दोघि सत्वर भक्षिती ॥
भेदले हृदभाग हे ऋषिराज अंतरिं लक्षिती ॥ पातला सदनास

टी० १ शंभर. २ अद्वयज्ञानस्वरूपास. ३ मांसरक्ताचा. ४ गजगति.

सांगत कामिनीप्रति उत्तर॥ भेदले चरु यापुढें सखिकर्म होइल दुस्तर॥ ॥१८॥ साकी ॥ च्यवनविलोकुनि चरु च्यवन नें सदनिं वदे सुदतीला॥ भाग यथाविधि सेवुनि थां निज दिधला कीं वद नीला॥१९॥ होय म्हणे तें मुनींद्र बोले सुंदरि चरु बदलीला॥ जननीनें जन निंद्य स्ववतिची न प्रणेया-स्पद लीला॥२०॥ आर्या ॥ लब्धाग तिणें नेला भाग निचा भक्षिलास तूं नारी॥ अस्ताव्यस्तचि घडलें नोडवलें कर्म यापुढें भारी॥२१॥ साकी ॥ यास्तव होइल दारुण तुजसुत क्षत्रियउग्रस्वभावें॥ तज्जननिस अति शांतन पोरत द्विज उपरेत नृपभावें॥२२॥ आर्या ॥ जो क्षात्रधर्म तो तव वंशज करतील विप्र होऊनी॥ द्विजकर्मी रत होती तव पितृसुत सर्व भूसुरांहूनी॥२३॥ साकी ॥ ऐकुनि राजसुता पतिवचना होय मनीं बहुदीना॥ करजोडुनि करि पुन्हा विनंती च्यवन पदांबुज लीना॥२४॥ नसो विगतैनय तनय असा मज लांछन होय मला जें॥ कीं मुनिं दयिता असुनि विपर्यय संततिचा मन लाजे॥२५॥ वाचा तुमची मृषा न व्हावी विफला नचि मम यांचा॥ आचारान्वित होवो मत्सुत क्षत्रियसुत जननीचा॥२६॥ तुमचें वचनहि सत्य व्हावया होवो न नसे नातू॥ माझा क्षत्रियतिचाहि मुनिवर मानीं या वचना तूं॥२७॥ ओंवी ॥ आयकोनी पत्नीचें वचन॥ तथास्तु म्हणे च्यवन॥ होतील यथोचित नंदन॥ पौत्रजाणविपर्ययें॥२८॥ आर्या ॥ कुशिकात्मजगाधी मग जाला राजर्षि यावरी पाहीं॥ च्यवनात्मज जमदग्नी शूरपहा वंदिला समयाहीं॥२९॥ घनाक्षरी ॥ गाधिपुत्र तपी फार॥ विश्वामित्र अनिवार॥ तपश्चर्येचा विचार ॥ सर्व जनां ठाउका॥३०॥ पढे जमदग्नी वेद॥ जाणे सर्व कळा भेद॥ आकळीत धनुर्वेद॥ महाशूर उग्र तो॥३१॥ जाणे शस्त्र अस्त्र सर्व॥ झाडी शत्रूंचे गर्व॥ तपी देव जसा शर्व॥ महाक्रोध अंतरीं॥३२॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित॥ रेणूराय अनंगकाय विजयी त्याची सुता रेणुका॥ साक्षाच्छ्रीजगदंबिका अवतरे राजा करी कौतुका॥ योजी लग्नविधें नरेश गजरें केला असे होपण॥ तेकाळीं जमदग्नि जाय बळिया जो आस्थी आपण॥३३॥ इंद्रवज्रा॥ जिंकोनि राजे वधू आणियेली॥ तें शौर्य वल्लीप्रति-

---

१ अदलाबदल. २ प्रीतिठेवण्याजोगी. ३ विरक्त. ४ अन्यायी. ५ ऋषिभार्या. ६ मिथ्या. ७ मदनासारखे रूप -जिंकून.

वृद्धि केली ॥ नानाविलासें बहुकाळ गेला ॥ ऐकापुढें पुण्यरवी उदेला ॥ ३४
कालाख्य शंभू सुत एक जाला ॥ कामाख्य धाता उदरासि आला ॥ वि-
ष्णू स्वयें आत्मजराम नाम ॥ जाले तिघे नंदन पूर्ण काम ॥ ३५ ॥ गर्भभ्रांतीचा-
तली रेणुकेला ॥ गर्भामध्यें भासतो देव ठेला ॥ १दूर त्याचा दीसतो सर्व
भाव ॥ नाहीं शब्दीं संपर्कावीण नांव ॥ ३६ ॥ दिंडी ॥ मनीं जाय डोहळे पु-
सायासी ॥ मूर्ति देखे सांवळी तेजराशि ॥ म्हणे कांते आवडी काय बोल
॥ ये रि बोले ऐकतां येति डोल ॥ ३७ ॥ मी तों आहें सच्चिदानंदराम ॥ व-
र्णि आश्रम पाळिना सौख्य धाम ॥ तपश्चर्या आदरें आचरावी ॥ शूरतेची
पूर्णता दाखवावी ॥ ३८ ॥ श्लोक ॥ पृथ्वीछंद ॥ म्हणे द्विजपरेश हास-
वळ गर्भवासी हरी ॥ पुढें निजपराक्रमें नृपतिचीं कुळें संहरी ॥ विशेष म-
म भाग्य हें सुफळरूप जालें असे ॥ तरीच जगदीश हा धरुनि आवडी
येतसे ॥ ३९ ॥ दिनेदिन कळा चढे नवहि मास झाले बरे ॥ मुनी बहुत हर्ष-
ला मनिं न तोष तो सांवरे ॥ तदा सुदिनिं देतसे चपळ दर्शन श्रीपती
॥ पिता जननि हर्षुनी सुखहि सर्वदां पावती ॥ ४० ॥ आर्या ॥ त्रेतायु-
गप्रमाथीं सुवसंतीं माधवाख्य शुक्ल तिजे ॥ शनि रोहिणीस रात्रीं ए-
कादशि घटिस जन्म आयकिजे ॥ ४१ ॥ नाहणी ॥ तया नाहणी न्हा-
णि तेरेणु काही ॥ तुरवि जनिं अघ यच्चरण रेणु कांहीं ॥ नयीं जननीच्या
अंकिं भार्गवासी ॥ देववनिता पाहती स्वर्गवासी ॥ १ ॥ स्नेह लाउनी म-
स्तकीं परशुरामा ॥ शुद्ध उदकें वरि घालिती सुरामा ॥ परी न कळे कीं स्ने-
ह या अमाया ॥ नसे मालिन्यहि नित्य विमल काया ॥ २ ॥ चरण शरणा-
गत लोक पापवारी ॥ तया अनपेक्षित अन्य तीर्थ वारी ॥ वामना हें आ-
श्चर्य फार वाटे ॥ परी युक्तिकीं सर्व भक्ति वाटे ॥ ३ ॥ ४२ ॥
॥ आर्या ॥ ते काळीं जगदीश्वर जन्मा आला पिता विलो सुख ॥ पुत्राव-
न तात करी मातेचे माइना मनांत सुख ॥ ४३ ॥ आल्या सुवासिनी ब-
हु हळदी बहु कुंकुमेंचि घवघवती ॥ सुमनें वर्षति सुरवर विबुधांचे व-
दलचंद्र दवदवती ॥ ४४ ॥ षष्ठीपूजन झालें द्वादश दिनिं राम ठेविलें नाम ॥
सद्गुणगाती वनिता घालुनि पां पाळण्यांत सुखधाम ॥ ४५ ॥ पाळणा

१ सद्भावांचून.

जोजोजो जोरे सुखधामा ॥ भार्गव पूर्ण कामा ॥ ध्रु० ॥ क्षत्रियसंहारी रणांगणीं ॥ उग्रस्वभाव करणी ॥ भारी श्रमलासी खेळणीं ॥ उद्धरितां-ही धरणी ॥ जो जो जो० ॥ १ ॥ धेनूद्विजांचे पाळणा ॥ करितां धरि अव-तरणा ॥ तुजला निजवीतें पाळणां ॥ दीनावरि करि करुणा ॥ जो० ॥ २ देव अवतरले हृषिकेशी ॥ भृगुऋषींच्या वंशीं ॥ संगें घेउनियां हरवि-धिसी ॥ रेणुकेच्या कुशीं ॥ जोजो० ॥ ३ ॥ सागर सारुनियां वसवीलें ॥ कोंकण जन पाळीले ॥ दुष्टाचरणांतें दंडीलें ॥ यश प्रसिद्ध केलें ॥ जो० ॥ ४ ॥ स्वस्थ निजावें भार्गवा ॥ अखंडित चिरंजीवा ॥ योगमाया ती करि सेवा ॥ परशुरामा देवा ॥ जो० ॥ ५ ॥ हालवी रेणुका पाळणा ॥ गा-ईल्या आचरणा ॥ सखया रामाच्या आभरणा ॥ चुकवी जन्ममरणा ॥ जो० ॥ ६ ॥ ४५ ॥ **श्लोक** ॥ स्वागता ॥ वृक्षवल्लिस फलोदय दृष्टी ॥ कूजती पिक सुरवी मग सृष्टी ॥ धान्य दृष्टि टळले अपघात ॥ राम-जन्म बरवा सकळांत ॥ ४६ ॥ ऐसा असे परशुराम सुजन्म राया ॥ तो ऐकतांचि जग पावन पूर्ण ठाया ॥ श्रीरामकृष्ण गुरुचाचि धरून संग ॥ वर्णी सुधासम रसाद्भुत पांडुरंग ॥ ४७ ॥ असो - तात्पर्य इतकेंच कीं, च्यवन ऋषींनीं समदृष्टीनेंच भाग दिले असतां सत्यवतीच्या मातेनें कपट केलें, त्याप्रमाणें संततींत व्यत्यय झाला हें फल तिला प्राप्त झालेंच. पुढें सत्यवतीनें प्रार्थना केल्यावर च्यवन ऋषींनीं दयाळूपणानें तें कांहीं का-ळावर घातलें यावरून च्यवनासारखे जे महात्मे साधु त्यांच्या ठिका-णीं समदृष्टी आणि दयाळुता हे गुण मुख्यत्वेंकरून असतात. हाच आशय मनांत आणून शिवरामस्वामी प्रथम पदांत म्हणतात सं-त दयाळु कसे ॥ राजा रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥ कृष्णा रामा रामा हो राम रामा (भजन) पुंडलीक वरदे हरी विठ्ठल ॥ पार्वती पते हर हर महा देव ॥ जानकी जीवन स्मरण जय जय राम ॥ तव कथामृत नसजीव-नं० ॥ आरती परशुरामाची ॥ जयजय जय जमदग्निज भृगुकुल कुमुदविधो ॥ अवलोकय नीराजनमगणित गुणसिंधो ॥ ध्रु० ॥ पितु-रपराधविधायिनि हैहय भूमिपतौ ॥ आवहता क्रुधमचिराद् भवता यदिह मतौ ॥ क्षितिरक्षत्रियनिवहा ऽक्रियतेयसामितौ ॥ तन्महि पार्श्व

१ शद्ध करिती.

सहायो स्वभ्रजावेवमतो॥जयज०॥१॥क्वाभिजनोवाक्वतपः क्व संगस्था-
र्ता॥क्व दयाक्वारिवधूनांक्षितिरार्तस्वार्ता॥नत्तुपितृचरणपरायण धर्मावन
कर्त्रा॥युक्तं तदपि यदासीःकिलनृपमदहर्त्रा॥जय०॥२॥इष्टंनानायागैः
पर्यष्ठिताचरसा॥ दत्ताच दक्षिणायेऋत्विग्भ्यस्तरसा॥इत्यखिलाचकृ-
तिस्ते भगवन्निह स्फरसा॥तद्दामनोनमतिशुभपदयुगलं शिरसा,ज-
यज०॥३॥कायेन वाचामन० अच्युतंके०॥ हेराम०पुंडलीकव०पार्व०
सीताकांतस्म०जयजय०॥ ॥इतिपरशुरामजन्माख्यानं समाप्तम्॥

# कथा ६वी.

## पूर्वरंगनिरूपणम्.

श्रीगणेशायनमः॥ अविरलमदजल इत्यादिनमनं॥ नारायणहरी॥ सां-
वळ्यानारायणहरी॥इति भजनम्॥पुंडलीकवरदे०॥पार्वतीप०॥सी-
ताकांत०॥ पद ॥अवघा तूंचि हरी तूंचि हरी॥तूंजीवन मी लहरी॥ध्रु०
जननि जनक तूं बंधू॥सखाजिवलग करुणासिंधू॥अव०॥१॥सद्विद्या
निजधन तूं॥देउनि तोडिशि भवबंधन तूं॥अव०॥२॥ निजरंगातूं पाहीं
॥अवघा तूंचि मी तूं नाहीं॥अव०॥३॥ आदौ कीर्तनारंभीं भगवज्जना-
वतंस रंगनाथस्वामी हे परोक्ष ज्ञानानें सर्व ब्रह्म आहे अशी भावना ज्यां-
स झाली आहे. परंतु अपरोक्ष साक्षात्कार नसल्यामुळें स्वानंदजन्य
तृप्तिरहित अशा साधनचतुष्टयसंपन्न मुमुक्षु अधिकाऱ्यांस सच्चि-
दानंदघन परमात्म्याचीच सर्व जगांत व्याप्ति आहे हें स्वानुभवानें सम-
जून अखंडित तृप्ति व्हावी या उद्देशानें ईश्वराचें सर्व रूपत्व वर्णन क-
रतात.॥अवघा०॥ हे परमेश्वरा, सर्व तूंच आहेस. तुजवांचून याजगां-
त कोणीही नाहीं. आतां यांत "वदतो व्याघातः" याप्रमाणें दोष येतो.
कारण सर्व तूंच असें म्हणणारा एक वेगळा आहेच. तरयाविषयीं
म्हणतात.॥तूंजीवन०॥तूं जल आणि त्यावर उत्पन्न होणारी लहरी म्ह-
णजे लाट.मी अर्थात् उदकावर लहरी असून भिन्न नाहींत.तद्वत् हें ज-
गत् तुझ्यावरच असून भिन्न नाहीं. तूंच सर्व आहेस. याविषयीं नृसिंह
वपूकार म्हणतात.॥श्लोक॥ पृथ्व्यां पाथसि पावकेच पवने दिक्ष्वंतरि-

क्षे पुनर्मार्तंडे शशिमंडले ऽग्निसुतले यथ्येतने ऽचेतने॥ यश्चांतर्बहिरप्यनंत विभवो भावे प्यभावे ऽपि यः सर्वत्रास्ति सदास्ति किंबहुगिरा त्वय्यस्ति मय्यस्ति च॥१॥ अर्थ-परमात्मा हा पृथ्वी, उदक, अग्नि, वायु आणि सर्व दिशा यांचेठायीं आहे. तसाच आकाश, सूर्य, चंद्र, व पाताळ या ठिकाणीं आहे, चेतनांत आणि अचेतनांतही आहे. आंत व बाहेर सर्व व्यापून आहे. ज्याचें ऐश्वर्य अनंत असून भाव व अभाव या सर्वस्थळीं त्याची व्याप्ति आहे. तो सर्वठिकाणीं व सर्वकाळीं आहे. प्रल्हाद म्हणतो पित्या फार बोलून काय उपयोग? परंतु तात्पर्य हेंच कीं, सर्वव्यापक तोच परमात्मा तुझेठायीं व माझेठायीं ही आहे. मोरोपंत म्हणतात.-आर्या- भूजल तेज समीरख रविशशि काष्ठादिकीं असे भरला ॥ स्थिरचर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुळें उरला॥ अर्थ॥ पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आणि आकाश तसेच चंद्र सूर्य व दिशा यांच्या आंत परमात्मा ओतप्रोत भरला आहे. किंबहुना स्थावर जंगम सर्व व्यापून जगदंतर्यामी जो ईश्वर तो आणखी दशांगुळें म्हणजे अनंतपणानें स्वरूपीं उरलाच आहे. परमात्म्याची जगांत व्याप्ति कशी आहे व जग परमेश्वराचेठायीं कसें आहे. याविषयीं शंकराचार्य म्हणतात. आर्या- दंतिनि दारुविकारे दारुतिरोभवति सोपि तत्रैव॥ जगति तथा परमात्मा परमात्मन्यपि जगत्तिरो धत्ते॥१॥ अर्थ-ज्याप्रमाणें लांकडाचा हत्ति जर केला तर हत्ती आहे अशा दृष्टीनें पाहणारांस लांकूड दिसत नाहीं. कारण त्याची दृष्टि हत्तीकडे असल्यामुळें ही सोंड हे पाय अशीच त्याची समजूत असते. त्याच हत्तीकडे लांकडें विकत घेण्याच्या इच्छेनें कोणी मनुष्य गेला त्याची दृष्टी मुळींच हत्तीवर नाहीं तर हें लांकूड आहे याचें वजन किती भरेल इत्यादि विचारांत त्यास तें लांकूडच दिसतें. हत्ती दिसत नाहीं. याप्रमाणें जगांत परमात्मा व परमात्म्याचे ठिकाणीं जगत् आहे. ज्याची दृष्टी हत्तीसारख्या या कृत्रिम जगतावरच आहे त्याला काष्ठासारखा परमात्मा त्यांतच व्यापक असूनही दिसत नाहीं. आणि जे आत्मानात्म विचार करून सर्वत्र परमात्म्याची व्याप्ति आहे असें जाणतात त्यांस हें मायिक जग मुळींच दिस-

न नाहीं. तर सर्व काय आहे तें एक परमात्माच आहे. असा त्यांचा अनुभव असतो. अतएव हें भासमान जें जग तें मिथ्या होय. वास्तविक पाहतां परमात्माच सर्व आहे. अशा अभिप्रायानें रंगनाथस्वामी म्हणतात. अवघा तूंचि हरी०॥ आतां कोणी म्हणेल जर याप्रमाणें परमेश्वराची सर्व ठिकाणीं व्याप्ति आहे तर सर्वांस त्याची प्रतीति कां येत नाहीं? तर याविषयीं कवि दृष्टांत सांगतात॥ श्लोक॥ नहिनिर्मथनं विनेंधनाग्निः परिलभ्यो निकटे वसन्नपि॥ गुरुशास्त्रनिषेवणंविना नहि लभ्यं निजरूपमात्मनः॥ १॥ अर्थ— जसा अग्नि सर्व इंधनांत अंतर्गत असून मंथन केल्यावांचून प्राप्त होत नाहीं. तसें परमात्म्याचें स्वरूप सर्वव्यापक आहे खरें. परंतु सद्गुरूला शरण जाऊन सच्छास्त्र जे वेदांत व उपनिषद् यांचा विचार केल्यावांचून त्याची प्रतीति होत नाहीं. ज्यांनीं शमदमादि साधनें संपादन करून सद्गुरूची कृपा संपादन केली आहे. त्यांनां परमात्म्यावांचून जगांत कांहीं एक दिसत नाहीं. तर जिकडे जिकडे त्यांची वृत्ति जाते तिकडे तिकडे परमात्मवस्तूच दिसते. याविषयीं आचार्य म्हणतात॥ श्लोक॥ यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधयः॥ १॥ अर्थ— सत्पुरुषांचें मन जेथें जेथें जातें तेथें तेथें परमात्मस्वरूप असल्यामुळें समाधीच आहेत. तात्पर्य एक परमात्माच विश्वरूप आहे याविषयीं कवित— निपटनिरंजन म्हणतात.॥ नरभयो नारीभयो पशूपंछी असवारभयो, घोडकासरूप भयो, हत्ती हो दिखायो है॥ फूलहो फूल्यो, कहां भवरहो भूल्यो, कहां पवनहो झूल्यो, कहां पानीहो बहायो है॥ बोलतहै बेदनमें, डोलतहै कुंजनमें, लोलतहै बनमें, सो आपहि आप बनो है॥ साहेबरचो अजब थट्ट, आपहि लीला आपहि नट्ट, निपटा कहे हो परगट्ट, घटघट बीच छायो है॥१॥ या प्रमाणें एक परमेश्वरच सर्व रूपानें नटला आहे. भीष्माचार्यांचाही असाच अभिप्राय आहे.॥ श्लोक॥ नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे॥ सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटी युगधारिणे नमः॥ १॥ अर्थ॥ हे परमेश्वरा, सहस्र म्हणजे अनंत आहेत मूर्ती ज्याच्या त्या तुला माझा नमस्कार असो. ज्याचे पाय

नेत्र, मस्तकें, मांड्या आणि बाहु हे अनंत आहेत. तशींच अनंत नामेंज्यास आहेत आणि अनंत कोटि ब्रह्मांडें धारण करणारा, कालस्वरूपी अखंड दंडायमान सर्वांतर्यामी असा जो तूं त्या तुला श्री अनंता माझे नमस्कार असोत. याचप्रमाणें अर्जुनोक्ति भगवद्गीता श्लोक—अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम्॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप॥१॥ अर्थ—ज्यावेळेस भगवंतांनीं विश्वरूप अर्जुनास दाखविलें त्यावेळीं अर्जुन तें विश्वव्यापी रूप पाहून ह्मणत आहे. हे विश्वेश्वरा, जगन्नियंत्या, परमेश्वरा, तुला बाहु, उदरें, वक्त्र, म्हणजे मुखें आणि नेत्रही अनंत आहेत. आणि तुझ्या स्वरूपाला मर्यादा नाहीं असें मी पाहतों. परंतु याचा आदि मध्य आणि अंत हे मला दिसत नाहींत. ज्ञानेश्वर म्हणतात.॥ ओंवी॥ तैसे एकची निरंतर॥ देवा देखत असे तुझे कर॥ करीत अवघेची व्यापार॥ एकेचि काळीं॥१॥ मग महाशून्याचेनि पैसारें॥ उघडलीं ब्रह्मकटाहाचीं भांडारें॥ तैसीं देखतसें अपारें॥ वदनें तुझीं॥२॥ तैसीं वक्त्रें जेवुतीं तेवुतीं॥ तुझीं देखतसें विश्वमूर्ती॥ आणि तयाची परी नेत्रपंक्ति॥ अनेका सैंघ॥३॥ हें असो स्वर्ग पाताळ॥ कीं भूमी दिशा अंतराळ॥ हे विदक्षा ठेली सकळ॥ मूर्तिमय देखतसें॥४॥ किं बहुना आतां॥ तुझें तूंचि आघवें अनंता॥ हे पुढतपुढती पाहतां॥ देखिलें मिया॥५॥ परि या तुझ्या रूपा आंत॥ जी उणीव एक असे देखत॥ जे आदि मध्य अंत॥ तिन्हीं नाहीं॥ याप्रमाणेंच रंगनाथस्वामींनींही पदांत म्हटलें आहे॥ पद॥ चित्उदधी निजरंग, भासे जगदाकार तरंग॥ ध्रु०॥ मायामृगजळ शाश्वत नसतां॥ धांवति जीव कुरंग॥ भा०॥१॥ दृक्भ्रमयोगें रज्जू न जाणे॥ वादेतीव्र भुजंग॥ भा०॥२॥ पुत्रकलत्र गणगोत्र मित्र धन॥ गज रथ धेनु तुरंग॥ भा०॥३॥ पूर्णरंग निजरंगीं रंगुनि॥ होय सहज भवभंग॥ भासे०॥४॥ सच्चिद्घन परमात्मा समुद्रच आहे. जग हें त्यावर तरंगाप्रमाणें आहे. याप्रमाणेंच सर्व जग ईश्वरस्वरूपावरच कल्पित आहे. याविषयीं अक्रूरोक्ति आहे.॥ भागवतश्लोक॥ त्वय्यव्ययात्मन् पुरुषे प्रकल्पिता लोकाः सपाला बहुजीवसंकुलाः॥ यथाजले संजिहते जलौकसोऽप्युदुंबरे बाम-

शकामनोमध्ये ॥१॥ अर्थ ॥ हे अविनाश स्वरूपा परमेश्वरा, जसें-पाण्यांत जलचरें (मत्स्यादिक) अथवा उंबराचे फळांत किडे राहतात. परंतु त्या पाण्याची अथवा उंबराची इयत्ता त्यांस कळत नाहीं. तद्वत् सर्व जीवांसह हे लोक व लोकपाल तुझ्याठिकाणींच कल्पिले आहेत. यावर वामन पंडित म्हणतात ॥ श्लोक ॥ किडे उंबराच्या फळामाजि कोटी॥ असे अंड कोटीमध्यें जीव कोटी॥ किडे नेणती आणिका उंबरांशी॥ असे जीव हे नेणती अंडराशी॥१॥ अनेकें जशीं उंबरें एक वृक्षीं॥ तसा अंडकोटीस तूं एक साक्षी ॥ फळाच्या त्रिकाळीं तरू येथ जैसा॥ अनित्या जनां नित्य तूं एक तैसा॥२॥ इत्यादि अभिप्राय मनांत आणून कविप्रवर रंगनाथस्वामी म्हणतात ॥ अवघा तूंचि हरी ॥ भजन ॥ जयहरीनारायण॥ पुंडलीक०॥ पार्वती०॥ सीताकांत०॥ आतां जग म्हणजे काय आणि परमात्मा कोणता व त्याची जगद्रूपता कशी याविषयीं आचार्य वर्णन करितात॥ श्लोक ॥ अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंश पंचकं ॥ आद्यंत्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयम् ॥१॥ अर्थ-सर्व जगांत अस्ति म्हणजे आहे, भाति म्ह० भासतें, प्रियं म्ह० सुख, रूप म्ह० आकार आणि नाम असे पांच अंश आहेत त्यांत आद्यत्रय म्हणजे पहिले तीन अंश ब्रह्मरूप होत. आणि शेष राहिलेले दोन अंश म्हणजे नाम आणि रूप हें मायेचें रूप होय. आतां नाम आणि रूप हे ब्रह्मस्वरूपावर विवर्त म्ह० भ्रमरूप होत. कारण ब्रह्मस्वरूप जें अंशत्रय म्हणजे अस्ति, भाति आणि प्रिय किंवा सत् चित् आणि आनंद याला वेगळें करून पाहिलें असतां नामरूपें अनुभवास गोचर होत नाहींत. जसें रज्जूवर भासलेला सर्प ह्या रज्जू वेगळी करून कधींही भासत नाहीं. तद्वत् अर्थात् सर्पाप्रमाणें नामरूप हें मिथ्या होय. याविषयीं उपनिषद्वाक्यांत ही नामरूप वाचारंभण म्हणून सांगितलें आहे. आतां कोणी म्हणेल कीं, ब्रह्मस्वरूपें तीन आहेत. एक सत् दुसरें चित् आणि तिसरें आनंद तर रंगनाथ स्वामींच्या आरंभींच्या पदास विरोध येतो. कारण अवघा तूंचि हरी यांत तूं या एक वचनावरून तीन स्वरूपें आहेत, असा बोध होत नाहीं, तर एकच स्वरूप असा बोध होतो. तर याविषयीं ज्ञानेश्वरानीं विरोधपरि

हार केला आहे ॥ **ओंवी** ॥ सत्ताप्रकाशस्फुरण ॥ यातिहीं तिहीं उणे लेख ॥ जैसें विषपणेंची विख ॥ विखासी नाहीं ॥ १ ॥ अर्थ–सत्, चित्, आनंद हे तीन शब्द आहेत. परंतु यांच्या अर्थांत तीनपणा नाहीं. जसें विष इतरांस विष आहे खरें. परंतु विषाला विष विषपणानें नाहीं. यास दृष्टांत–॥ **ओंवी** कांति काठिण्य कनक ॥ तिन्ही मिळोनी कनक एक ॥ द्रव गोडी पीयूख ॥ पीयूखचि जेवीं ॥ १ ॥ अर्थ–तेज, कठिणपणा, आणि सोनें मिळून सोनें एकच. तसेंच ओलेपणा, गोडी आणि अमृत मिळून अमृत एकच, त्यांत तीनपणा होत नाहीं. १ ॥ याप्रमाणेंच सच्चिदानंद हेही तीन नाहींत तर तिन्ही मिळून एकच स्वरूप आहे. याकरितां रंगनाथ स्वामी म्हणतात ॥ अवघा तूंचि० ॥ एवंच नामरूपात्मक मिथ्याभूत जगांत सच्चिदानंद रूपानें एका परमात्म्याचीच व्याप्ति आहे. आतां कोणी म्हणेल तर जगद्दर्शनानेंच परमात्म दर्शन होऊन जीवांस सहज मोक्षप्राप्ति व्हावी तसें कां होत नाहीं, तर याविषयीं आचार्य म्हणतात ॥ **श्लोक** ॥ सत्तास्फुरत्ता परमात्मनो या नाच्छादये त्तासुपजीव्य भावात् ॥ आनंदमाच्छादयतीव केवलं तन्नाशने तत्त्वमसीति वाक्यम् ॥ १ ॥ अर्थ–परमात्म्याची जी सत्ता ह्मणजे अस्तित्व आणि स्फुरत्ता म्हणजे चित्शब्दवाच्यप्रकाश त्या दोहोंस माया आच्छादन करीत नाहीं. कारण त्या दोन्हींवरच मायेची उपजीविका आहे. म्हणजे नामरूपात्मक मायेला सत् आणि चित् हे आधार आहेत. म्हणून यांचें आच्छादन तिच्यानें करवत नाहीं. तर ती केवळ आत्मस्वरूपभूत जो आनंद त्याला मात्र आच्छादन केल्यासारखें करते. याकरितां मायाकृत आनंदाच्छादनाचा नाश करण्यासाठीं तत्त्वमस्यादि वाक्यें आहेत. ॥ तात्पर्य–जगद्दर्शनांत परमात्म्याचे सत्, चित् हे अंश सर्वांस गोचर आहेतच. परंतु आनंद मात्र मायेनें आच्छादन केल्यामुळें गुप्त आहे तो सद्गुरुकृपेनें प्रगट झाला म्हणजे सच्चिदानंदघन परमात्माच सर्व जगांत घनदाट भरला आहे. अशी ज्यांस दृष्टी झाली ते मुक्तच आहेत. असा आशय मनांत आणून मुक्तदृष्ट्या रंगनाथ स्वामी वर्णन करितात ॥ अवघा तूंचि० ॥ नारायण हरि० ॥ भजनं ॥ पुंडली० ॥ पार्वती० ॥ जानकी जी० ॥ एवं स्थावरजंगमा-

त्मक सर्व जगांत परमात्माच अंतर्यामी आहे. त्यावांचून अणुरेणूही रिक्त नाहीं. हेंच प्रतिपादन करण्याकरितां श्रीनृसिंहावतारचरित्र कवि निरूपण करितात.

## अथनृसिंहजन्माख्यानप्रारंभः

श्लोक ॥ प्रहर्षिणी ॥ वंदूनी नरहरिराजपादपद्मा[1] ॥ ज्यासेवी त्रिभुवनसुंदरीहि पद्मा[2] ॥ प्रल्हाद प्रथित[3] चरित्र वर्णितों कीं ॥ तें होवो सुगमहि मान्य वृद्ध[4] लोकीं ॥ १ ॥ पूर्वी जे जयविजयाख्य विष्णुलोकीं ॥ त्यां झाला सनकमुखर्षि शाप तो कीं ॥ दैत्यांच्या कुक्षि उपजाल जालभूतें ॥ तें जन्मत्रय सरतां भजा प्रभूतें ॥ १ ॥ आर्या ॥ ते प्रथम कनककशिपु[5] कनकाक्ष[6] असें प्रसिद्ध दितिगर्भी[7] ॥ आले ज्येष्ठ सुदुष्कर करुनि तपा तोषवी कनकगर्भा[8] ॥ ३ ॥ श्लोक ॥ भुजंगप्र० ॥ कनिष्ठासि विष्णू वराहावतारीं ॥ वधूनी मही बूडतां तीस तारी ॥ तयीपासुनी वाढलें वैर ज्याचें ॥ करी ज्येष्ठ तो अर्चन श्री अजाचें[9] ॥ ४ ॥ साकी ॥ चरणांगुष्ठसे देह धरनिप खप्परनजर धरी है ॥ प्रानजीतके अलग रख्या अजि पवन पिया करता है ॥ ॥ ५ ॥ दिंडी ॥ अशी दारुण पाहुनी तपश्चर्या ॥ प्रगट झाला विधिवरद असुरवर्या ॥ मनीं मानी बहुतया प्रबळवीर्या ॥ म्हणे मागें जें इष्ट अचळ धैर्या ॥ ६ ॥ श्लोक ॥ मालिनी ॥ अजर अमर काया आपुली तो कराया ॥ तप करि वर मागे ध्यातया लोकराया ॥ नमृति[10] मज म्हणे हो चेतना चेत नाहीं ॥ मरण हरि असें कीं, दीस रातींत नाहीं ॥ ७ ॥ श्लोक ॥ भागवत ॥ नांतर्बहिर्दिवा नक्तं मन्यस्मादपि चायुधैः ॥ न भूमौ नांबरे मृत्युर्नरैरपि मृगैरपि ॥ ८ ॥ अर्थ — मला मृत्यु, आंत व बाहेर नसावा ॥ रात्रीं आणि दिवसांही नसावा ॥ तूं उत्पन्न केलेल्यापासून आणि अन्य सृष्टापासूनही नसावा. आयुधांनीं नसावा. मनुष्यांपासूनही नसावा, पशूंकडूनही नव्हावा, तसाच भूमीवर आणि आकाशांतही येऊं नये ८

---

१ कमळ. २ लक्ष्मी. ३ प्रसिद्ध. ४ आबाल वृद्धांस. ५ हिरण्यकशिपु. ६ हिरण्याक्ष. ७ कश्यपस्त्री. ८ ब्रह्मदेवास. ९ ब्रह्मदेवाचें. १० मरण.

॥ आर्या ॥ झाला भक्तविरोधी विष्णुद्वेषी सुराधिकारांसी ॥ हरुनी स्वल संस्थापी त्या त्या स्थानीं स्वकीय चारांसी ॥ ९ ॥ श्लोक ॥ भागवत. ॥ सएवंवर्णाश्रमिभिः क्रतुभिर्भूरिदक्षिणैः॥ इज्यमानो हविर्भागानग्र-हीत्स्वेन तेजसा ॥ १० ॥ अर्थ–सर्व वर्णाश्रमी लोक मत्तुर दक्षिणादिपक्त यज्ञें करून त्या हिरण्यकशिपूचेंच आराधन करूं लागले. आणि तोही आपल्या तेजानें सर्व हविर्भाग ग्रहण करिता झाला ॥ १० ॥ श्लोक ॥ स्वागता ॥ त्यावरें अमर मानवलोकीं, स्वामि तोचि फळ हें अवलोकीं ॥ देववृंद अवघाच पळाला ॥ भीति सर्वहि तयाच पळाला ॥ ११ ॥ अभंग ॥ त्रासले अंतरीं नचाले उपाय ॥ आठविती पाय गोविंदाचे ॥ १ ॥ झालासी निष्ठुर कां रे कृपावंता ॥ सोडवी अनंता नामाम्हणे ॥ २ ॥ १२ ॥ श्लोक ॥ इंद्रवज्रा ॥ ते सर्वही प्रार्थिति देवदेवा ॥ कीं आपुलें घे पद देवदेवा ॥ झाली बहू बुद्धि अधीर वाणी ॥ तों बोलली हो अशरीरवाणी ॥ १३ ॥ श्लोक ॥ भागवत ॥ मा भैष्टविबुधश्रेष्ठाः सर्वेषां भद्रमस्तु वः॥ मद्दर्शनं हि भूतानां सर्वश्रेयोपपत्तये ॥ १४ ॥ अर्थ-हे देवश्रेष्ठ हो, भिऊं नका ॥ तुम्हां सर्वांचें कल्याण असो; माझ्या दर्शनापासून जीवांस सर्व कल्याणाची प्राप्ति होते ॥ १५ ॥ निर्वैराय प्रशांताय स्वसुताय महात्मने ॥ प्रल्हादाय यदा द्रुह्येद्धनिष्येऽपि वरोर्जितम् ॥ १५ ॥ अर्थ–निर्वैर, शांत, महात्मा, आपला पुत्र जो प्रल्हाद त्याचा जेव्हां तो दुष्ट द्रोह करील तेव्हां तो जरी ब्रह्मवरानें इतका प्रबल झाला आहे तरीही मी त्याचा वध करीन ॥ १५ ॥ श्लोक ॥ उपजाति ॥ कीं हा तपें तोषवि अब्जजाला ॥ त्याच्या वरें सर्व अवध्य जाला ॥ तथापि मारीनचि दुर्धराया ॥ गांजील माझ्या जधिं भक्तराया ॥ १६ ॥ शिखरिणी ॥ कयाधूचे पोटीं सुत सुमति झाला गुणनिधी ॥ तयाला देखोनी जनक सुख मानी निरवधी ॥ म्हणे याचीं चिन्हें सकळ दिसती सुंदर बरीं ॥ असो हा दीर्घायू असुर कुळिंचा दीपक घरीं ॥ १७ ॥ प्रकर्षे आल्हादें रमविल तुम्हांला निशिदिनिं ॥ म्हणोनी पाचारा गुरु म्हणति

---

१ दूतांस-हेरांस.

प्रल्हादवचनीं ॥ द्विजां द्या गोदानें गज-तुरग यानें रथ धनें ॥ अनंतां वाद्यां चे गजर गुरुगाती त्रिभुवनें ॥ १८ ॥ दिंडी ॥ पांचवर्षे प्रल्हाद वयाआली ॥ पिता शाळे मार्झारि तया घाली ॥ गुरुहि शिकविति कौतुकें शुक्रकाळीं ॥ प्रथम ओनामा त्यास तपःशाली ॥ १९ ॥ पद ॥ प्रल्हादाचें सुजनाल्हादक रुचिर चरित परिसा ॥ जयास्तव होय हरी हसा ॥ ध्रु० ॥ जनक विलोकुनि कनककशिपु त्या हर्ष जनक सुततनया ॥ म्हणे जगीं तुल्य दिसे सुत नया ॥ कवळि असे मति तोंवरि कवळिल सकळाही नृपनया ॥ बळें मग करिल त्रिभुवन जया ॥ असें वदुनि गुरुसुता असुरपति पाचारुनि सविनया ॥ म्हणे त्या शिकवाया मत्प्रिया ॥ चाल ॥ हा बाळ विशाळ मज्ञ असे याजी ॥ रुचि गमेल तेंतें आरंभा त्याजी ॥ ऐकतांचि हर्षित झाले नृप योजी ॥ यजमान तनय धृत विनय गृहातें नेति मुदित फारसा ॥ विलोकिति नम्रमति जण आरसा ॥ १ ॥ प्रल्हा० ॥ प्रथम करुनि आरंभ तयाला शिकविति ओनामा ॥ धरुनि नृपसूनुवरी प्रेमा ॥ तो गुरुवर्णित आर्कर्णित जरि कर्णी हृदयीं प्रेमा ॥ सुनिर्णितचिंती हरी नामा ॥ गुरु शिक्षित वरिवरी म्हणे परि अंतरिं निष्कामा ॥ रुचेना त्या गुरुची गरिमा ॥ ॥ चाल ॥ तो करी पाठ जरि सुखें ओनामासि ॥ अंतरीं न विसरे श्रीहरिनामासी ॥ तो विरक्ति सुखी विषयान्नामासी ॥ सद्युक्ति योगें सक्ति रमापति चरणिं भक्ति सोरसा ॥ सुलंपट तसा नसे नवरसा ॥ प्रल्हा० ॥ २ ॥ २० ॥ ॥ आर्या ॥ जेंजें गुरू शिकविती लेखन मोडी लिहीहि ओनामा ॥ चित्तीं म्हणे विफळ हें मज शिकविति अंतरेन हो नामा ॥ २१ ॥ सारे वर्ण पुसावे एक हरी हेचि सार वगळावे ॥ करितां शासन हरिचे कीं दासा भ्रू महीस नगळावे ॥ २२ ॥ पद ॥ जाय नियत शाळेंत प्रतिदिनिं पुत्र म्हणुनि तो करी, पिता बहु प्रेम मनें त्यावरी ॥ एके दिवशीं कांचनकशिपु घेउनि अंकावरी ॥ पुसे त्या संतोषुनि अंतरीं ॥ आवडनें तुज काय शिकसि जें त्यातिल वद लोकरी ॥ म्हणुनि तहृदनांतें सांवरी ॥ श्लोक ॥ उपजाति० ॥ एके दिनीं घे सुत दैत्य अंकीं ॥ तो स्नेह त्याचा गणवेन अंकीं ॥ पुसे तया

---

१ हिरण्यकशिपु. २ कुल-गुरु. ३ आनंदयुक्त. ४ ऐके. ५ यथार्थज्ञान. ६ श्रेष्ठता. ७ आंकड्यांनीं.

भागवतोत्तमानें ॥ कीं आवडे जें तुज सांग मातें ॥ २३ ॥ ओंवी ॥ माझे आवडी-
ची कथा ॥ तुवां पुसिली गा नृपनाथा ॥ भावें भजावें भगवंता ॥ अन्य सर्वथा ना-
वडे ॥ २४ ॥ भावें करावें हरिपूजन ॥ साष्टांगेशीं अभिवंदन ॥ नित्यनमावे सा-
धूजन ॥ अनन्य भजन हरिभक्ती ॥ २५ ॥ श्लोक ॥ उपजाती ॥ प्रल्हाद
बोले सदन त्यजावें ॥ तपोवनालागिं अगत्य जावें ॥ तेथें भजावें हरिच्या
पदातें ॥ जो आपदातें हरि दे पदातें ॥ २६ ॥ दैत्येश्वरा आवडि हेचि मा-
तें ॥ कीं सेवणें श्रीपुरुषोत्तमातें ॥ त्यजून विष्णूस भजे गृहातें ॥ तो आपु-
ला घात करी स्वहातें ॥ २७ ॥ दुःखार्णवीं जो धरि कांस याची ॥ चिंताल-
याला मग कासयाची ॥ नवीसरावेंचि कदापि त्याला ॥ प्रल्हाद इत्या-
दि वदे पित्याला ॥ २८ ॥ चाल ॥ प्रल्हाद धरुनि आल्हाद ह्मणे जनका
॥ गृहसंग त्यजुनि सेवणें जगज्जनका ॥ फल नयेचि तुझें याकां-
ता कनका ॥ परिसे कनककशिपु[1] मग हांसे ॥ गुरुसि म्हणे सहसा ॥
मुलानविसंबुनि रक्षित असा ॥ प्रल्हा० ॥ ३ ॥ श्लोक ॥ द्रुतविलं० ॥ परि-
सतां असुरेश्वर हांसिला ॥ मग म्हणे कवणें शिशु नाशिला ॥ शिकवि-
लें बरवें अथवा जसें ॥ वदति तेंचि मुलें असिं राजसें ॥ २९ ॥ श्लोक ॥
भुजंगप्र० ॥ ह्मणे हा करावा गुरूनें विचार ॥ स्वयें ठाउकें लेंकरा काय
चार ॥ हरी आसुच्या[2] वाड्याचा फकेला ॥ नयान्याजनीं हा कुळीं भेद
केला ॥ ३० ॥ गुरूतें असें दैत्य सांगूनि धाडी ॥ नया वाटली गोष्टही देवथा-
डी ॥ भिऊनी मनीं तर्क नाना करीती ॥ नया पूसती विप्र सामादिरीती ॥
॥ ३१ ॥ पद ॥ गुरु पुसति तुज कुमति कुणि असि सांग असे साध-
ली ॥ म्हणे तो हरि करुणें साधली ॥ धिक्कारुनि बकु पुनः गुरूनीं
असुर नीति बोधिली ॥ शिके मनिं त्याज्यपणें बाधिली ॥ दिंडी ॥ रा-
जपुत्रा तुज बुद्धि अशी कोणी ॥ दिली सांगेही त्वरित कपटवाणी ॥
स्वकीयांनीं कीं बोल परकियांनीं ॥ जिला त्वद्गुरु गुरु शिक्षिताचि
मानी ॥ ३२ ॥ श्लोक ॥ शिखरिणी ॥ म्हणे श्री प्रल्हाद स्वपर म्हणु-
नी भ्रांति उकली ॥ केली इच्छा मूळें असुर अमरीं आणि सकळीं ॥

---

1 हिरण्यकशिपु. 2 तुझा बाप. 3 कलह.

कळी ह्रदयाची उकलिल कशी मोहरजनी ॥ जनीं ऐशा सूरीं मति न धरितां विष्णुभजनीं ॥ ३३ ॥ ओंवी ॥ चुंबकसन्निधि लोह जैसें ॥ चंचळ होतसे आपैसें ॥ श्रीहरी सान्निध्यें उल्हासे ॥ माझी मति हे तैसी ॥ ३४ ॥ श्लोक ॥ इंद्रवज्रा ॥ तों बुद्धि कोपें खवळे द्विजाची ॥ जाची म्हणे टाकि कथा अजाची ॥ बाभूळ हे चंदन काननासी ॥ नाशील भेदून निरंजनाशीं ॥ ३५ ॥ ओंवी ॥ म्हणे आणारे माझें वेत्र ॥ वाचाळ बोले हा अपवित्र ॥ ऐसा निर्भर्त्सूनि राजपुत्र ॥ पुनः निजविद्या शिकविती ॥ ३६ ॥ साकी ॥ शिकविति कविसुत राजसुता मग कविता षड्गुणनिज नीती ॥ परिसे तो गुरु जवळि म्हणे परि वमनापरिमानीती ॥ ३७ ॥ गुरु पढवुनि मग नेति नृपात्मज भेटविती जनकातें ॥ तोहि विलोकुनि मुदित ह्रदय त्या बैसवि निज अंकातें ॥ ३८ ॥ श्लोक ॥ वसंत० ॥ बा शीकलासि गुरुपासुनि जो पसारा ॥ सारा असो तुजरुचे वद त्याच सारा ॥ गोष्टी वदे कुशल यावरि ज्या पित्याला ॥ त्या लागतील मधुरा न कदापि त्याला ॥ ३९ ॥ मालिनी ॥ श्रवण हरिकथेचे कीर्त्तनीं गात जावें ॥ स्मरण चरण सेवा अर्चनींही भजावें ॥ नमन करुनि दास्यें सख्य आत्मार्पणातें ॥ करिति तरति वाटे सार हें आपणातें ४० ॥ पद ॥ पिता फिरुनि रुचि पुसतांचि वदे जे ह्रदयीं शोधिली ॥ सदा यन्मति हरिनें वेधिली ॥ चाल ॥ कीं श्रवण कीर्त्तनादिक भक्ति नवविधा ॥ मज रुचे भवार्णविं तारक हेचि बुधा ॥ ऐकतांचि खवळे खळ करिमतित हुधा ॥ अनळ गरळ जल शैल पात गज बंध करी आळसा ॥ त्यजुनि तो दैत्य शिणे विफळ सा ॥ म्ह्णा० ॥ ४१ ॥ श्लोक ॥ पृथ्वीछंद ॥ हिरण्यकशिपु स्वयें परिसतां असी वैखरी ॥ म्हणे गुरुसुता तुझी कपट मित्रता हे खरी ॥ पुरोहित म्हणे नमीन जन अन्य हा भाव दे ॥ अजी सहज बुद्धि हे तव कुमार जेंजें वदे ॥ ४२ ॥ द्रुतवि० ॥ गुरुमुखें न अरे जरि शी कशी ॥ कुमति उद्भवली तुज हे कशी ॥ सुत म्हणे विषयांत सदा पित्या ॥ असि न बुद्धि नरासि कदापि त्या ॥ ४३ ॥ इंद्रव० ॥ हे तों गुरूपाप नरू म्हणावे ॥ अंधास वें अंध तसे गणावे ॥ देप्रीति कृष्णीं गुरु तोचि साच ॥ श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच ॥ ४४ ॥ दिंडी ॥

१ छडी. २ वापास. ३ हर्षफक्त.

असें वर्णित वर्णित श्रीधराला॥ त्याच मांडीवरि समाधिस्थ जाला॥ न-
दा होउनियां रुष्ट त्या खळानें॥ अहो भूमीवरि लोटिला बळानें॥ ४५॥
इंद्रवज्रा॥ याचा वधी जो चुलता सखारे॥ हा त्यास पूजी तुम्हि यास
खारे॥ दांतें नखें पर्वत शस्त्रपातें॥ मारा म्हणे सत्वर निस्त्रपातें॥
॥४६॥ उपजा०॥ ते मारिती बाप म्हणेचि मारा॥ मारा न लागे तरि त्याकु-
मारा॥ न तोडितें खड्ग रुतेन भाला॥ भोलागते कीं नमहो नभाला॥ ॥
॥४७॥ आर्या॥ गीति॥ सेवक हो तनयाला होमा ज्वलनांत अन्य अंत
नघाला॥ दहनचि जेथिल यातें पावो कुमति पतंग जेविं लयातें॥ ४८॥
हा बकुधा मायावी हे पीडा माझिया न धामा यावी॥ या खलडिंभाजा-
रे घालुनियां शीघ्र लांकडें भाजारे॥ ४९॥ श्लोक॥ चंपू॥ जगदीशनि-
देश मंतरा दहनो नैष दहेत किंचन॥ यदि तत्र भवेत् स्वतंत्रता जठे-
रस्थो न दहेत किं वपुः॥ ५०॥ अर्थ– अग्नि हा जगदीश्वराच्या आज्ञे-
वांचून कांहीं एक जाळण्याला समर्थ नाहीं. जर त्याला स्वतंत्रता अ-
सेल तर मग जठराग्नि आपल्या शरीरास कां दग्ध करणार नाहीं ५०
॥ आर्या॥ गीति॥ ते निर्दय मानसखा यातें ऐसें वदून पवमान सखा
॥ लाविति परि तो यासी धाकें न शिवे तदा जसा तो यासी॥ ५१॥
चंपूगद्य॥ भो वन्हे त्वमिदानीमस्मत्कार्यं साधय सकल ब्रह्मांडद-
हन समर्थे त्वयि पलायमानोऽयमर्भकः किया नास्ते ततो निर्दग्धु
मुद्यतो वन्हिरपि प्रोच्छलदमर तरंगिणी जल कल्लोलायमानइव
हरेः प्रसादादासीत्॥ ५२॥ अर्थ– हे अग्ने, यावेळेस तूं आमची
कार्यसिद्धि कर॥ सकळ ब्रह्मांडें जाळण्यास समर्थ जो तूं त्या तु-
झ्याठायीं पळणारा हा बालक म्हणजे काय पदार्थ आहे? नंतर त्या-
स जाळण्याविषयीं अग्नि प्रवृत्त झाला असतांही श्रीहरीच्या प्रसा
दें करून भरून चाललेल्या भागीरथीच्या उदकांतील लहरीप्रमाणें
शीतळ झाला॥ ५२॥ श्लोक॥ शिखरिणी॥ अरे यासी बांधा भुजग
भुजपाशें करुनियां॥ समुद्रीं हा टाका चपळ करिशेंडी धरुनियां॥
गिराळीं लोटाहो अचळ शिखराग्रा वरुनियां॥ मला वाटे ऐसा कुमति

१ निर्लज्जातें. २ प्रकाश. ३ मुलास. ४ अग्नीस.

रून जावा मरूनियां ॥ ५३ ॥ **आर्या** ॥ नमरे यास्तव नेल्हा पर्वत शिरव-
रासि लोटिला खोली ॥ परि तो निर्भय चित्तीं वाहे नारायणासि लाखो-
ली ॥ ५४ ॥ **अभंग** ॥ बांधोनी पाषाण बुडवीला सागरीं ॥ वेषीयेल्याव-
री शिळा थोर ॥ ५५ ॥ **चंपू** ॥ वसंततिलका ॥ कुंभोद्भवेन मुनिनाब्धेतु शोषि-
तस्त्वं संपादितोऽसि हरिणांऽघ्रिजलैः पुनर्यत् ॥ मत्स्वामिनः स्मरसि
चेदुपकार मेतं न ह्यारिथ्ये मयि विधेहि कृपा मिदानीं ॥ ५६ ॥ **अर्थ** ॥ हे
समुद्रा पूर्वी तुला कुंभोद्भव मुनि जो अगस्त्य त्यानें प्राशन केलें हो-
तें परंतु पुनः माझ्या स्वामीनें आपल्या चरणोदकें करून तुला पूर्ण
केलें. तो उपकार जर तूं स्मरत असशील तर या वेळेस तूं मजवर कृ-
पा कर. ॥ ५५ ॥ **अभंग** ॥ आप नारायण रक्षी निजदासा ॥ लोटू-
नी सरसा कडे लावी ॥ २ ॥ न बुडेची कांहीं करितां उपाव ॥ रक्षी त-
या देव मागें पुरें ॥ ३ ॥ तुका म्हणे देव भक्तांसाह्यकारी ॥ रक्षी नाना
परी संकटीं तो ॥ ४ ॥ ५६ ॥ **ओंवी** ॥ राजा जाऊनि एकांता ॥ पाचारि-
ली निज कांता ॥ कयाधू परम पतिव्रता ॥ पती वचनार्थी सादर ५७
राजा म्हणे निष्ठुर देख ॥ तुज ऐकतां वाटेल दुःख ॥ परी मी बोल-
तो अवश्यक ॥ द्यावें विष प्रन्हादा ॥ ५८ ॥ तुज काय प्रन्हादाची चा-
ड ॥ किंवा वैधव्यपणाचें कोड ॥ दोहीं माजी कोण गोड ॥ जिवा हृद
आवडे ॥ ५९ ॥ येरी म्हणे राया सर्वज्ञा ॥ जन्मवरी केली नाहीं अव-
ज्ञा ॥ अवश्य करीन आजि आज्ञा ॥ अशुभ प्राज्ञा कां वदता ६०
॥ **दिंडी** ॥ असें बोलुनियां गरळ तें कयाधू ॥ सिद्ध करितां ये तनय
महा साधू ॥ म्हणे माता मग सख्या तुला तातें ॥ विष द्याया कथिय-
लें आजि मातें ॥ ६१ ॥ **साकी** ॥ ज्या हातें तुज दूध पाजिलें, लेव-
विलीं आभरणें ॥ कर्मगती अति दुर्घट सखया त्या हातें तुज मरणें
॥ ६२ ॥ **आर्या** ॥ मन्मातुरिंदिरायाः किंमुन जातं सहोदरं गरलंम्
॥ मातुलता सुपयातं तस्मां दस्मांस्क किं भयं भवेति ॥ ६३ ॥ **अर्थ**—
माझी सुरम्य माता जी लक्ष्मी तिचें विष हें सहोदर म्हणजे सख्खे
बंधु होय. कारण लक्ष्मी आणि विष दोन्हीही समुद्रांतून उत्पन्न
झालीं आहेत. अर्थात् विष हें नात्यानें माझें मातुल होतें. मग त्या

पासून मला भय काय आहे? ॥ अभंग ॥ वाटीभरी विष दिलें प्रल्हा-
दासी ॥ निर्भयमानसीं तुझ्या बळें ॥ भोक्ता नारायणें केलें तें प्राशन ॥ प्र-
तापें जीवन झालें तुझ्या ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें विषाचें अमृत ॥ जाह्-
लें देखत नारायणा ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें तुझें बडिवार ॥ शिणला भू-
धरवर्णवेना ॥ ४ ॥ ६४ ॥ श्लोक ॥ चंपू० ॥ न विषं विषमेव सर्वदा
न सुधा वाऽपि सुधा भवेद्धनः ॥ विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा वि-
षमीश्वरेच्छया ॥ ६५ ॥ अर्थ — विष हें सर्वकाळ विष होत नाहीं आणि
अमृतही सर्वकाळ अमृत होत नाहीं. तर ईश्वराच्या इच्छेनें विष हें
क्वचित् अमृत होतें आणि अमृतही क्वचित् विष होतें ॥ आर्या
॥ जे जे घात नियोजी तेथुनि वांचे नये क्षमा राया ॥ घाली तेल कटा-
हीं पाक कराया समक्ष माराया ॥ ६६ ॥ झालें तेल सुशीतळ नाम
श्रवणें मुरारिच्या सकळ ॥ ऐसें पाहुनि रागें अधिकाधिक तो क-
री तयास कळ ॥ ६७ ॥ जिकडे बांधुनि नेती तिकडे तो जाय परिन-
ये निधन ॥ कैंचीं विघ्न दरिद्रें येतिल असतां रमेश नाम धन ॥ ६८ ॥
॥ श्लो० ॥ वसंततिल० ॥ चिंतार्णवांत बुडतां असुरोत्तमातें ॥ वा-
टे तदा मरण[1] याचि निमित्तमातें ॥ तों नीतिनें करिति ते द्विज बोध
राया ॥ कीं बाळचेष्टित न योग्य मनीं धराया ॥ ६९ ॥ दिंडी ॥ बुडे
चिंता सागरीं असुरराजा ॥ म्हणे होइल यामुळें मृत्यु माजा ॥ त-
यीं वदती गुरुपुत्र महावीरा ॥ नसे चित्तीं चिंतेस हेतु धीरा ॥ ७० ॥
बाल चेष्टित हें काय मनिं धराया ॥ योग्य तुजला वद त्रिभुवनैकराया
या ॥ करिति बालक अनिवार अशा लीला ॥ नसति कारण या कु-
धिंच काळजीला ॥ ७१ ॥ श्लो० ॥ वसंतति० ॥ राजा म्हणे मग त-
याच पुरोहितातें ॥ कीं यास न्या स्वसदनीं शिकवा हितातें ॥ ऐसा-
करा त्वरित कीं धरि लोकरीती ॥ नेऊन ते द्विज घरास तसें करीती
॥ ७२ ॥ पद ॥ एक दिनीं गुरु विद्यासदनीं विद्यार्थी पढवितां ॥
निघे गृहकार्य सहज तत्वतां ॥ सांगुनि नियमित पाठ मुलांनां पा-
ठ कराया स्वतां ॥ होय निजकार्यवशें चालता ॥ संधि बघुनि तो सु

1 मरण.

बुद्धि नृपसुत सोडुनि गुरु शिक्षिता ॥ करीउपदेश दैत्य सुतहिता ॥ चा० ॥ हें जन्म सुदुर्लभ क्षणिकहि उपकारी ॥ बायांत भजावा ईश्वर कौमारीं ॥ कीं विषय लाभ हा सुलभचि संसारीं ॥ भुलूं नका तुह्मि अशा प्रपंचा क्षणमात्रीं विरसा ॥ सदा हरिहृदयीं चिंतुनि असा ॥ प्रल्हा० ॥ ५ ॥ भागवत श्लोक ॥ कौमार आचरेत्प्राज्ञो धर्मान् भागवतानिह ॥ दुर्लभं मानुषं जन्म तदप्यध्रुवमर्थदम् ॥ ७३ ॥ अर्थ—बुद्धिमान् पुरुषानें कौमारअवस्थेंतच भागवत धर्म आचरण करावे. कारण हें मनुष्य जन्म फार दुर्लभ आहे, आणि तें क्षणिक असून मोक्षरूप अर्थ देणारें आहे. ॥ पद ॥ गड्यानो घ्या हरिच्या नामा ॥ लिहितां कशास ओनामा ॥ ध्रु० ॥ सांगतों ऐका एक वर्म ॥ पहावे भागवती धर्म ॥ दुःखसें प्राप्त होय शर्म ॥ यत्न त्या कशासरे परम ॥ नपावे हरिवांचुनि क्षेमा ॥ लिहि० ॥ १ ॥ शरण सद्गुरुला जावें ॥ हरिभजनीं नच लाजावें ॥ हरीचें सगुण रूप ध्यावें ॥ निर्मळ भावें पुजावें ॥ सांडुन हृदयांतिल कामा ॥ लिहितां क० ॥ २ ॥ गृह धन जन यांची ममता ॥ धरुनी व्यर्थचि कां भ्रमतां ॥ हृदयीं वागवूनि समता ॥ हरिचे चरणांबुज नमितां ॥ नेइल हरि तो निजधामा ॥ लिहितां क० ॥ ३ ॥ ७४ ॥ पद ॥ कामक्रोधनिजबोधविघातक पातक मूळ खरें ॥ जिणावें आधीं पुरुषवरें ॥ लोभ कुमतिचा कोंभ करि मनः क्षोभनिजप्रसरें ॥ जयास्तव जीव तत्व विसरे ॥ नरकाचें हें द्वार त्रिविध हीनरजारि सुविचारें ॥ त्यजिल तरि होय सुखी बारे ॥ चाल ॥ यासाठिं सांगतों तुह्मां नका भवि गुंतूं ॥ हे विषय भोगिती सकळहि जिवजंतू ॥ तुह्मि हरिचरणा भजा नका धरूं किंतू ॥ संतुष्ट करा प्रभु कष्ट नसति बहु इष्ट जगीं हरिसा ॥ नसे त्या झगटारे परिसा ॥ ६ ॥ प्रल्हा० ॥ श्लोक ॥ द्रुतवि० ॥ उमजला मजला हरिच्या सुखें ॥ गुरुच तो रुचतो हृदयीं सुखें ॥ शिकवणें कवणें मज त्याविना ॥ निजपणीं जपणीं जड दाविना ॥ ७५ ॥ पद ॥ उदंड यापरि तत्वांडिं त्या शंडउभा राहुनी ॥ परिसतां चंड कोपतो मुनी ॥ तसाच गेला बहु रागेला असुर राजसदनीं ॥ वदे सुतवृत्त मुळापासुनी ॥ दैत्य तत्क्षणीं रक्तईक्षणीं होय रुष्ट मंदनी ॥ तया मग आणवि पाचारुनी ॥ चा० ॥ येतांचिक-

शी तो निजजनका प्रणती ॥ दुर्जनासि झाली अति दुःसह्यपणती ॥ हा प्रसंग दारुण दुरून जन ह्मणती ॥ तो अदांत खाउनि दांत करावा अंत ह्मणे अरिसा ॥ वदे मग क्रोधजवासरिसा ॥ प्रन्हा० ॥ ७ ॥ **श्लोक** ॥ उपजाति० ॥ गालिप्रदानीं नकरूनि घाणी ॥ वाणी वदे हो अपवित्रवाणी ॥ म्हणे खळा दैत्यकुळाधमातें ॥ मारीन जो तूंन भिशीच मातें ॥ ७६ ॥ इंद्रवज्रा ॥ मी क्रुद्ध होतां मज लोक सारे ॥ भीती भिशी एक न तूं कसारे ॥ याशासना लंघिशि दुर्गमातें ॥ कोणाबळें सत्वर सांग मातें ॥ ७७ ॥ ॥ **पद** ॥ शक्रहि भिवई वक्र पाहतां भीतमना भीतरीं ॥ नकसि मम्दीति तुला अंतरीं ॥ त्रिभुवननायक मी तूं जोडिसि मद्रोषा कां तरी ॥ निजायुःसूत्र न बाकांतरी ॥ कवणाचें बळ खळा असे तुज कोणाची खातरी ॥ सांग मी वधितों तुज नातरीं ॥ ॥ चाल ॥ प्रन्हाद वदे मग पित्या जयाच्या बळें ॥ पशुपक्षि मनुज देवता वृंद चळबळे ॥ बहु तेजज याचें सकळांहूनि आगळें ॥ त्याचें बळ मज तुम्हां जगासहि नचि संशयसहसा ॥ सत्य कीं अनृत श्रुतिला पुसा ॥ ८ ॥ प्रन्हाद० ॥ **श्लोक** ॥ वसंततिलका ॥ माझें तुझेंच बळ तो इतकेंच नाहीं ॥ त्याचेंच कीं बळ असे सकळां जनांही ॥ तूं शत्रु मानिसि तया असुर स्वभावें ॥ तो राखिसील मग देखसि आत्मभावें ॥ ७८ ॥ घनाक्षरी ॥ प्रन्हादाशीं दैत्य थोर ॥ म्हणे मज थोर थोर ॥ भीति बोलतां समोर ॥ भें न वाटे तुजला ॥ १ ॥ तूं नातरुण किशोर ॥ पांच वरुषांचें पोर ॥ म्हणसी साजण हे चोर ॥ नागविती मजला ॥ २ ॥ बोल बोलशी तिखट ॥ मरूं पाहसी फुकट ॥ मृत्यु आलासे निकट ॥ नाहीं तूज समजला ॥ ३ ॥ तुझा मी प्रत्यक्ष काळ ॥ हा कामारुन विशाळ ॥ आणि तुझा रक्षपाळ ॥ लपे जाणों लाजला ॥ ४ ॥ ७९ ॥ चंपू० ॥ स्रग्धरा ॥ यस्मादुत्पन्नशंकाः प्रतिभटपृथिवीनायकाः सायकांकाः कौपीनांकाः कथंचिद्गिरिवरशिखरे वासरान्वाहयंति ॥ नम्री भूतेंद्रसुरव्यामरमुकुटमणीराजिनीराजितांघ्रेर्मत्तोऽप्यास्ते परः कस्तव जगति विभुर्व्योमपुष्पायमाणः ॥ ८० ॥ अर्थ—माझे प्रतिस्पर्धी जे जे पृथ्वीपतिराजे ते माझ्या भीतीनें धनुष्य बाणादि चिन्हें टाकून कौपीन धारण

१ वेग.

करीत होत्साते पर्वताचे दरींत राहून कसेतरी दिवस घालवितात. आणि इंद्रादि देव नम्र होऊन आपल्या मुकुटांतील रत्नदीपांनीं ज्याच्या चरणांस नीराजन करतात त्या मजवांचून या जगांत आकाशपुष्यासारखा तुझा प्रभु कोण आहे? ॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित ॥ त्रिभुवनेश्वर जो मज वेगळा ॥ तुजगमे सकळांहुनि आगळा ॥ जरि दिसेल अरे मज ईक्षणीं ॥ वधिन त्याचिपुढें तुज ये क्षणीं ॥ ८१ ॥ पद ॥ भुजंगसा मग खवळे दुर्जन नर्जन करुनि पुसे ॥ खळा वद कवणे स्थळीं तो असे ॥ प्रल्हाद म्हणे न वाद येथें स्थिर चर व्यापुनि वसे ॥ मनोजय करितां मग गवसे ॥ असुर म्हणे या स्तंभीं न दिसे तनय म्हणेचि दिसे ॥ करी मग मुष्टिघात भ्रमवशें ॥ घनाक्षरी ॥ अरे तुझा कोठें देव ॥ म्हणे सर्व वासुदेव ॥ विश्वपदीं स्वयमेव ॥ तंतु तोचि वसतो ॥ १ ॥ आर्या ॥ नष्टप्रज्ञा, वदरे कोठें जगदीश तो तुझा आहे ॥ प्रल्हाद म्हणे मत्प्रभु सर्वगत ज्ञानदृष्टिनें पाहें ॥ ८२ ॥ घना० ॥ दैत्य म्हणे अरे थांब ॥ गोष्टी ठेवी लांबलांब ॥ मज समोर हा खांब ॥ येथें कैसा असतो ॥ २ ॥ अभंग ॥ कोपोनियां पिता पुसे प्रल्हादासी ॥ सांगें हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं ॥ आहे वनमाळी जेथें तेथें ॥ २ ॥ घना० ॥ म्हणे स्तंभ दारुरूपं ॥ दारूमध्यें चित्स्वरूप ॥ थीजलें नथापि तूप ॥ रसतो न भासतो ॥ ३ ॥ तरी दिसे न कां मज ॥ म्हणे भजोनि समज ॥ प्रत्यक्षही अधोक्षज ॥ दिसे ना तो दीसतो ॥ ८३ ॥ श्लोक० ॥ शिखरि० ॥ असे रे तो कोठें तुज बहु जयाचे भरवसे ॥ वसे सर्वांगायीं स्थिरचरपदीं तंतु गवसे ॥ दिसेना कां स्तंभीं मज दिसतसे तो नरहरी ॥ हरी तो दुष्टांचे त्वरित मद जो एकचि हरी ॥ ८४ ॥ असे स्तंभीं ऐसा श्रवणिं पडतां शब्द असुरा ॥ सुरापानीं मत्त स्वहितविषयीं जो निदसुरा ॥ सुराधीश द्वेषें करुनि हृदखड्गें क्षय करें ॥ करें हाणी मुष्टी वळुनि खळ खांबास निकरें ॥ ८५ ॥ अभंग ॥ खांबावरी मूठ मारिली दुर्जनें ॥ स्तंभीं नारायण प्रगटला ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा खांब कडाडला ॥ ब्रम्हा दचकला सत्य लोकीं ॥ ४ ॥ ८६ ॥ आर्या ॥ आहे स्थाणूंत अ-

---

१ भय. २ स्तंभांत.

सीं ऐकुनि वाक्यें स्वरषड्ग महिवरला॥ उचली भेद कराया नेव्हां क्षीरो
दजेश गहिवरला॥ ८७॥ श्लोक॥ स्वागता॥ स्तंभ तो अवचिताचि क-
डाडी॥ अब्जजांड अवघेंचि खडाडी॥ अब्जजादि हृदयांत धडाडी॥ का-
लमेघ शतनाद गडाडी॥ ८८॥ घनाक्षरी॥ ध्वनी ऊठला अखंड॥ व्या-
पी द्वीप खंड खंड॥ वाटे करी खंड खंड॥ ब्रह्मांड विदारुनी॥ १॥ दिग्ग-
जांचे चंड चंड॥ भग्न होती शुंडा दंड॥ लेंडे टाकिती उदंड॥ पायू वायू
सारुनी॥ २॥ भ्याले दैत्य भंड भंड॥ दानवेंद्र मुंड मुंड॥ होती त्यांचे पिं-
ड पिंड॥ रोमांच उभारुनी॥ ३॥ रात्रिंचर कलमंड॥ झाले षंड षंड थंड
॥ जेव्हां सिंह रणशौंड॥ निघे हाक मारुनी॥ ४॥ ८९॥ श्लोक॥ उ-
पजाति॥ खरी कराया निज भक्त वाणी॥ आणीं स्वकीं व्यासिस हीन
वाणी॥ स्तंभीं सभे अद्भुत रूप दावी॥ मनुष्य ना सिंह तनू वदावी॥
॥ ९०॥ चाल॥ तत्क्षणीं कडाडुनि खांब अंबराया॥ ध्वनि जाय अंतरीं
भीति दैत्य राया॥ जाहला प्रकट नरसिंह भक्तराया॥ रक्षाया नखिं
असुर विदारी उरिं सायान्हीं नसा॥ विधीचा वरहि नुलंघे जसा॥ ९॥
चंपू०॥ लोकान्नाकुलयन्नभः कवलयन् दिक्कुंभिनः कंपयन्॥ भू-
गोलं चलयन् गिरीन्विदलयन्नंभोधि मुद्वेलयन्॥ दिग्वृंदं भ्रमयन्
मनो विकसयन् ब्रह्मांडमास्फोटयन् स्तंभादाविरभूद्रव प्रति रवैर्वै
कुंठे कंठीरवः॥ ९१॥ अर्थ— सर्व लोकांस व्याकुल करीत, आका-
शास ग्रासीत, दिग्गजांस भयानें कांपवीत, भूगोलास हालवीत,
पर्वतांस चूर्ण करीत, समुद्रांस उचंबळवीत, दश दिशांस भ्रमवी-
त, भक्तांचे मनास उल्हासवीत, आणि सकळ ब्रह्मांड मंडपास श-
ब्दांच्या प्रतिध्वनीनें फोडीत भगवान वैकुंठवासी विष्णू नृसिंहरू-
पानें स्तंभापासून प्रगट झाला॥ ९१॥ आर्या॥ कृतयुग माधव शु-
क्लीं भूततिथी मंदवार अनिलर्क्षी॥ वेळा संध्या सुख तैं स्तंभीं प्रगटे
मुकुंद हर्यक्ष॥ ९२॥ श्लोक॥ द्रुतवि०॥ मनुज रूप नव्हे नरकेसरी,
कनकवर्ण कटीं पट केसरी॥ सकळसृष्टि करूं न शके सरी॥ प्रगट होय
असा नरकेसरी॥ ९३॥ विधिवर प्रतिपाळक जो हरी॥ न दिवसांत निशीं

१ वैशाख. २ चतुर्दशी. ३ स्वाती. ४ नरसिंह.

तहि संहरी ॥ म्हणऊनि फक्त निशामुखिं तो करी ॥ मग वधी बुडतां रविलो-
करी ॥ ९४ ॥ न धरणीवरि मृत्यु नवा नभीं ॥ वर असा म्हणऊनिच तो न-
भी ॥ निजतनू वरि त्या खळशेखरा ॥ चिरि धरूनि करी वर तो खरा ॥
॥ ९५ ॥ नगेही न बाहेरि यालागिं दारीं ॥ बसे उंबरा पोट त्याचें विदारी
॥ सजीवें अजीवें मरेना तसाची ॥ चिरूनी नखें तो करी गोष्ट साची ॥
॥ ९६ ॥ चंपू० ॥ बह्वधा शिशुरुषे दनुः कृता न तदाऽप्यास दया मनागपि
॥ तदमुष्य दुरात्मनो मया त्हृदयं कीदृश मित्य वेक्ष्यते ॥ ९७ ॥ अर्थ-आ-
पल्या लहान मुलास यानें जेव्हां अनेक भयंकर यातना केल्या तेव्हां
याच्या मनांत अल्पही दया उत्पन्न झाली नाहीं. तर या दुरात्म्याचें हृ-
दय कसें आहे हें, मी अवलोकन करितों ॥ पद ॥ उग्र कृति मग मां
डी वरि त्या मांडी नरहरि खला ॥ तदा सुरसमूह बहु हरिखला ॥ जाणों
हरिनें धरुनि निजांकीं असुरपती जो खला ॥ म्हणे तो मज पडली शृं-
खला ॥ प्रखर नखीं रिपु उदरिं विदारुनि तद्रुधिरें माखला ॥ गळां धरि
अंत्रमनीं तोरखला ॥ चाल ॥ पाहून उग्रतनु भीती सुरसारे ॥ इंदिराजा-
हली त्हृदयीं विरसारे ॥ प्रल्हाद तृषित नरसिंह कृपांबु तुषारें ॥ सिक्त
होउनी सक्त पदांबुजिं भक्त दया सरसा ॥ नमी त्या शिरसा वामन-
सा ॥ १० ॥ प्रल्हादाचे सुजनाल्हादक० ॥ जयास्तव० ॥ श्लोक ॥ द्रुतविं०
॥ बुळबुळे निसटे करि तांतडी ॥ असुर तो हरि काढुनि आंतडी ॥ उ-
दर फाडुनि घालितसे गळां ॥ करि सुमंगल देव अमंगला ॥ ९८ ॥
आर्या ॥ जंघा धार नियोजुनि त्यानें स्वनखीं विदारिलें उदर ॥ जयज-
यकार नभीं बहु सुर करिति जयां मनांत ही नदर ॥ ९९ ॥ उठला तेथुनि
मग त्या प्रल्हादाला चहूं भुजीं कवळी ॥ रूपें क्रूर भयंकर पाहुनि को
णी नये तथा जवळी ॥ १०० ॥ श्लोक ॥ द्रुतविलं० ॥ स्वपित यास नहो
अधमा गति ॥ म्हणउनी विनवी शिशु मागुती ॥ हरि म्हणे सुत ज्या-
स असा असे ॥ सुगति पावति पातकि ही असे ॥ १०१ ॥ आर्या ॥ आ-
पण भक्तिसुखवास्तव परमानंदें तदीय गेहातें ॥ राहे निश्चळ मानस
तत्कृत पूजादि सर्व घे हातें ॥ १०२ ॥ तात्पर्य-प्रल्हादाच्या वचनाप्र-

माणें सर्वभूतांत परमात्म्याची व्याप्ति हें नारायणांनीं स्तंभांत अवतार धरून प्रगट केलें. यावरून जळस्थळ काष्ठ पाषाण इत्यादिकांत ओतप्रोत हरीच भरला आहे. हा आशय मनांत आणून रंगनाथस्वामी म्हणतात. अवघातूंनि हरी०॥ हेंचि दान देगा देवा॥ तुझा विसरन व्हावा॥ नलगे मुक्ति धनसंपदा॥ संतसंग देगा सदा॥ गुण गाईन आवडी॥ हीच माझी सर्व जोडी॥ ॥ आरती नृसिंहाची॥ कडकडिला स्तंभ गडगडिलें गगन॥ अवनी होत आहे कंपायमान॥ तडतडलीं नक्षत्रें पडताती जाण॥ उग्ररूपें प्रगटे तो सिंहवदन॥१॥ जयदेव जयदेव जय नरहरिराया॥ आरती ओंवाळूं महाराजया॥ ध्रु०॥ एकवीस स्वर्ग माळा डळमळली कैसी॥ ब्रह्म यावें वाटे अभिनव विन्नासी॥ चंद्र सूर्य दोनी लोपती प्रकाशीं॥ कैलासीं शंकर दचके मानसीं॥२॥ जय०॥ थरथरती त्या जदा जिव्हा लळलळित, तीक्ष्ण नखें तो दैत्य विदारित॥ अर्धांगीं कमलजा शेष छाया धरित। माधवदासास्वामी नरहरि शोभत॥३॥ जयदे०॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात्॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेतत्॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भजे॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे॥ नारायण नारायण इति भजनं॥ पुंडलीक वरदे हरिविठ्ठल॥ पार्वती पते हरहर महादेव॥ जानकी जीवन स्मरण॥ जयजय राम॥ इति नृसिंहजन्माख्यानं संपूर्णम्॥

---

## कथा ७वी.

## पूर्वरंग निरूपणम्

श्रीमन्मंगलमूर्तयेनमः॥ अविरलमदजलनिवहं इत्यादि नमनं॥ शिवशंकर गौरीरमणा॥ कानये दिनाची करुणा॥ इति भजनम्॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल॥ पार्वतीपते हरहर महादेव॥ जानकीजीवन स्मरण जयजयराम॥ पद॥ भज भज भवजलधि माजि मनुजा शिवाला॥ ध्रु०॥ सांडुनियां विषयवमन॥ झडकरि करि षड्रिदमन॥ पुजि मन हें करुनि स्र-

मन ॥ गिरिजाधवाला ॥ भजभज० ॥ १ ॥ घडिभरि तरी करुनि विमल ॥ धरिशिल हृद चरणकमल ॥ तरिच सकल पापशमल ॥ त्यज रे भवाला ॥ भज० ॥ २ ॥ सावध हो करिशि काय ॥ शंकर गुरु बाप माय ॥ चिंतुनि कवि रामपाय ॥ हृदयीं निवाला ॥ भज० ॥ ३ ॥ ॥ आदौ कीर्त्तनारंभीं कविवर्य रामजोशी जिवांनां संसार समुद्रांतून तरण्याविषयीं उपाय सांगतात. भजभज० ॥ १ ॥ हे मनुजा, तूं या भव समुद्रांत बुडतो आहेस यांतून पार होण्याची जर तुला इच्छा आहे तर शिवपरमात्मा जो याचें भजन कर. आतां 'भजभज' म्हणून जी द्विरुक्ति आहे तिचें तात्पर्य हेंच कीं, इतरव्यासंगांत प्राणी निरंतर सक्त झाले आहेत त्यांनां सावध करण्याविषयीं द्विरुक्तीनें म्हणतात. भजभज० ॥ आतां कोणी म्हणेल कीं, इतर देव सोडून शिवालाच भजावें याचें काय कारण? तर संकटांत धांवणारा शंकरावांचून दुसरा कोणी नाहीं. याविषयीं नीलकंठचंपूंत कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ शार्दूल वि० ॥ दृष्ट्वा कौस्तुभमप्सरोगणमपि प्रक्रांतवादा मुहुर्गीर्वाणाः कति वा न संति भुवने भारादिवः केवलं ॥ निष्क्रांते गरले द्रुते सुरगणे निश्चेष्टिते विष्टपे मा भैष्टेति गिरो विरोसि धुरियो देवस्तमेव स्तुमः ॥ १ ॥ अर्थ — कवि म्हणतात. समुद्रमंथनाचे वेळीं जेव्हां कौस्तुभ, अप्सरा आणि अमृत इत्यादिक रत्नें निर्माण झालीं तेव्हां आपल्याला मिळावीं म्हणून एकमेकाशीं वाद करणारे असे केवळ स्वर्गलोकास भारभूत देव पुष्कळ आहेत. परंतु जेव्हां भयंकर कालकूट विष निघालें तेव्हां भयानें सर्व देव पळूं लागले. आणि त्रैलोक्य अचेतनप्राय झालें. अशा महत्संकटाचे समयीं जो 'भिऊं नका भिऊं नका' म्हणून सर्वांसमक्ष प्रगट झाला आणि विष प्राशन करून सर्वांचें संकट दूर केलें त्याच देवाची आम्ही स्तुति करतों. तात्पर्य सर्व देव स्वार्थनिष्ठ आहेत. शंकर तसा नाहीं. याकरितां हे मनुजा तूं अनन्य भावानें श्रीशंकराचेंच भजन कर. म्हणून कवि म्हणतात. भजभज० ॥ १ ॥ हा शंकर ऐहिक व पारमार्थिक या दोन्हीं सुखांचाही दाता आहे याविषयीं कवि चमत्कारानें वर्णन करितात ॥ श्लोक ॥ अनुष्टुप् ॥ पार्वती फणि बालेंदु भस्म मंदाकिनी युता ॥ पवर्गरचिता मूर्तिरपवर्गप्रदायिनी ॥ १ ॥ अर्थ-

शंकराची मूर्ति प वर्गानें युक्त आहे. पवर्ग म्हणजे प, फ, ब, भ आणि म त्यां त अर्धांगीं पकारयुक्त पार्वती. गळ्यांत व हातांत फणि ( सर्प ), मस्तकीं बालेंदु ( बालचंद्र ) सर्व शरीरास भस्म आणि जटांत मंदाकिनी ( भागीरथी ) याप्रमाणें पवर्गरचित जरी शंकराची तनु आहे. तथापी ( अपवर्ग ) पवर्ग नव्हे तो अपवर्ग म्हणजे मोक्ष देणारी आहे ॥ २ ॥ कोणी म्हणेल शंकर हा स्वभावानें, आचरणानें व वेषानें ही अमंगळ आहे तर याविषयीं पुष्पदंत म्हणतात ॥ श्लोक ॥ शिखरिणी ॥ श्मशानेष्वाक्रीडा स्मरहरपिशाचाः सहचराश्चिताभस्मालेपः स्रगपि नृकरोटीपरिकरः॥ अमंगल्यं शीलं तव भवतु नामैव मखिलं तथाऽपिस्मर्तॄणां वरदपरमं मंगलमपि॥ १ ॥ अर्थ:- हे ( स्मरहर ) मदनांतका शंकरा, श्मशानांत क्रीडा, पिशाच सोबती, चिताभस्माचें चंदन, आणि नरमुंडांची माला, याप्रमाणें तुझा स्वभाव स्थूलदृष्ट्या अमंगलासारखा वाटतो, तथापि जे तुझें स्मरण करतात त्यांस तूं परममंगलरूपच आहेस ॥ शिवेति मंगलं नाम ॥ यावरून ही सर्व अमंगल पदार्थांस मंगलत्व देणारा शंकर आहे. तरत्याचेंच भजन करावें, या आशायानें कवि प्रथम पदांत म्हणतात. भजभज ॥ १ ॥ शिवमूर्ति सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे याविषयीं कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ कामदा ॥ छंदसि स्तुतां तां गरुश्रितां धूसरां सर्वत्वं यजाततां ॥ पंचबाणविश्रामकारिणीं विद्धि कामदां शंकराकृतिं॥ ॥ ४ ॥ अर्थ - हे मनुष्या तूं शंकराची जी आकृति आहे ती कामदा ( सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे. असें समज ॥ ती कशी आहे तर छंद म्हणजे वेद यांच्याठिकाणीं स्तविलेली, गुरु जे अगस्त्यादि मुनि त्यांनीं आश्रयिलेली, सर्व जगद्व्यापक, पंचबाण जो मदन त्याचा नाश करणारी यद्वा शंकरमूर्ति कामदा ( एक छंद ) आहे असें समज. कामदा कशी. वेदांत सांगितलेली जिच्या आधीं रगण आहे व पुढें य, ज या गणांनीं युक्त असून गुरुवर्णानें आश्रयिलेली पांच पांच अक्षरांवर विसावा देणारी अशी आहे. याप्रमाणें शंकर सर्व मनोरथ पूर्ण करणारा असून इतरांला अनुसरणें हें कसें आहे याविषयीं अपय्या दीक्षित म्हणतात. ॥ श्लोक ॥ मालिनी ॥ त्वयिसति शिव दातर्यस्म दभ्यर्थितानामितरम-

असिनें मूर्धा देवी देतैं प्रमोद अमराशीं ॥ ७२ ॥ महिष पडे तैं हाहाकार करुनि असुर सकळ पळतीच ॥ पळतीच एक समरीं मृतशेष द्रुत पुन्हां न वळतीच ॥ ७३ ॥ स्तविती मग मुदित विबुध जें आर्याचरित वासवा सहित ॥ गंधर्व गाति अमरीं नाचति बलि देति आसवासहित ॥ ७४ ॥ **पद** ॥ तारि मला जगदंब ॥ दुर्गेता० ॥ ध्रु० ॥ त्वच्चरणाविण देवि नसे मज ॥ अन्यजगीं अवलंब ॥ दुर्गेता० ॥ १ ॥ तनुभद महिष मला छळि निशिदिनिं ॥ सोडवि न करिं विलंब ॥ दुर्गेता० ॥ २ ॥ अंब तुझ्या चरणांबुजिं रुंजो ॥ वामनमन रोलंब ॥ दुर्गेता० ॥ ३ ॥ **श्लोक** ॥ द्रुतविलंबि० ॥ त्रिपुरसुंदरिच्या चरणांबुजा ॥ नमुनि आठवुनी वदनांबुजा ॥ त्रिविधताप शमास्तव जो महा ॥ ग्रथिशिवाजय वामन नाम हा ॥ १ ॥ एवंच देवीनें महिषासुराचा नाश करून सर्व देवानां अपरिमित सुख दिलें. त्यांचे सर्व अधिकार महिषासुरानें हरण केलेले त्यांस देऊन स्वर्गवासाचे भोग पुनः दिले. याचें कारण इतकेंच कीं, ते सर्व देव अंतःकरणानें हरिहरांसशरणागत होऊन वाणीनें त्यांचें नामगायन करून महिषासुर दत्त दुःख निवेदन करिते झाले. म्हणून हरिहरांच्या देवपक्षपातमूलक रोषाच्या तेजापासून तसेंच अन्य देवांच्याही क्रोधतेजापासून भगवती प्रगट झाली. त्यामुळें अनिष्टपरिहार आणि इष्टप्राप्ति हीं दोन्हीं फळें देवांस प्राप्त झालीं. तसेंच जे अनन्यशरण होऊन भगवन्नामस्मरण अखंड करतात त्यांच्या अंतःकरणांत भक्तपक्षपातजन्य भगवत्तेजापासून विद्याशक्तीचा उदय होऊन महिषरूप देहाभिमानजनित संसार दुःखाचा ती नाश करत्ये. याकरितां रंगनाथस्वामी म्हणतात. बापानो, नित्य दुःखरहित होऊन स्वानंदसमुद्रांत निमग्न असावें, अशी इच्छा असल्यास हें करीत जाकीं, – सदा श्रीहरिचें नाम मुखीं गात जा ॥ **आरती देवीची** ॥ दुर्गे दुर्घटभारी तुजविण संसारीं ॥ अनाथनाथे अंबे करुणाविस्तारीं ॥ वारीं वारीं जन्ममरणातें वारीं ॥ हारी पडलों आतां संकट निवारीं ॥ १ ॥ जयदेवी जयदेवी महिषासुरमथिनी ॥ सुरवर ईश्वरवरदे तारकसंजिवनी ॥ जय

---

१ भ्रमर.

देवीजयदेवी महिषासुरमथनी॥ सुरवरईश्वरवरदे तारक संजिवनी॥ ध्रु० त्रिभुवनभुवनीं पाहतां तुज ऐसी नाहीं॥ चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं॥ साही विवाद करितां पडले प्रवाहीं॥ ते तूं भक्तांलागीं पावसिल वलाहीं॥२॥ जयदेवी०॥ प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासा॥ क्लेशापासुनि सोडीं तोडीं भवपाशा॥ अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा॥ नरहरि तल्लिन झाला पदपंकजलेशा॥३॥ जयदेवी०॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्या त्मना वानुसृतस्वभावात्॥ करोमि यद्यत्सकलंपरस्मैनारायणायेति समर्पयेतत्॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भजे॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे॥ पालय पालय मां जगदंब॥ दीनमनाथ दयासरिदंब॥ इति भजनं॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल॥ पार्वतीपते हरहर महादेव॥ जानकीजीवनस्मरण॥ जयजयराम॥ जगज्जननीकीजय॥ इति श्रीदेवीचरितं समाप्तम्॥ ॥श्रीमज्जगदंबार्पणमस्तु॥ ॥ ॥

## कथा १०वी.

## पूर्वरंगनिरूपणम्.

श्रीमन्महागणाधिपतयेनमः॥ इत्यादिनमनं॥ विठाबाइ माउली॥ दयाकरि विठाबाई माउली॥ इति भजनं॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल॥ पार्वतीपते हरहरमहादेव॥ सीताकांतस्मरण॥ जयजयराम॥ अभंग ॥ गोकुळींच्या सुखा॥ अंतपार नाहीं लेखा॥ ॥ध्रु०॥ बाळकृष्णानंदाघरीं॥ आनंदल्या नरनारी॥१॥ गुढिया तोरणें॥ करिती कथा गाती गाणें ॥२॥ तुका म्हणे छंदें॥ मनमोहिलें गोविंदें॥३॥ अभंग झाल्यावर ध्रुवपद म्हणून पुनः पुंडलीकवरदे हरिविठ्ठल॥ पार्वतीपते हरहरमहादेव॥ सीताकांतस्मरण॥ जयजयराम॥ आदौ कीर्तनारंभीं भगवद्भक्तचूडामणि तुकारामाख्य साधु गोकुलवासी लोकांचें महाभाग्य वर्णन करितात॥ गोकुळींच्या०॥ गोकुळांत वास करणारे जे गोप गोपी यांचें जें सुखतें अवर्णनीय आहे. कारण इतर जीं सुखें आहेत त्यानां उत्तरक्षणीं नाश आहे, व इयत्ता आहे. आणि गोकुळवासी लोकां-

त्या सुखाला अंत व पार नाहीं म्हणून म्हणतात. ॥ अंतपार ना० ॥ या विषयीं भागवतांत दशमस्कंधीं ब्रह्मदेवाची उक्ति आहे ॥ श्लोक ॥ तद्भूरिभाग्यमिह जन्म किमप्यटव्यां यद्गोकुलेऽपि कतमांघ्रिरजोभिषेकं ॥ यज्जीवितं तु निखिलं भगवान्मुकुंदस्त्वद्यापि यत्पदरजः श्रुतिमृग्यमेव ॥ १ ॥ अर्थ — ब्रह्मदेव म्हणतात. हे श्रीकृष्णा, गोकुळांत किंवा जवळ एखादे अरण्यांत वल्लीचें किंवा तृणाचें जन्म प्राप्त होणें हें महद्भाग्य होय. कारण ज्यांत गोकुळवासी लोकांपैकीं कोणाचे तरी चरणरज मस्तकावर पडेल. तुह्मी म्हणाल कीं, गोकुळवासी लोकांच्या रजाचें इतकें काय माहात्म्य आहे? तर (यज्जीवितं०) ज्याचे चरणरज अद्यापी सर्व वेदशोधितच आहेत, परंतु त्यांस प्राप्त होत नाहीं. असा जो भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न मुकुंद तोच ज्यांचें सर्व जीवन आहे. म्हणून त्या गोकुळांतील लोकांच्या चरणधुळीचा अभिषेक ज्या तृणादि जन्मांत आपल्याला होईल तसें जन्म प्राप्त होणें महद्भाग्य होय. यांत संशय नाहीं. शुकाचार्यही म्हणतात ॥ श्लोक ॥ अहो भाग्यमहो भाग्यं नंदगोपव्रजौकसां ॥ यन्मित्रं परमानंदं पूर्णं ब्रह्म सनातनम् ॥ २ ॥ अर्थ — नंदगोप आणि इतरही गोकुळवासी जे लोक आहेत त्यांचें भाग्य मोठें आश्चर्यकारक आहे. कारण (यन्मित्रं०) परमानंदघन अविनाशी जें पूर्णब्रह्म श्रीकृष्ण हा ज्यांचा परममित्र आहे. हा आशय धरून तुकाराम म्हणतात. ॥ गोकुळींच्या सुखा० ॥ ब्रह्मस्तुतींत ब्रह्मदेव म्हणतात कीं, या गोपगोपींचा साक्षात् षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् ही ऋणी आहे. मग त्यांचें भाग्य काय वर्णन करावें? ॥ श्लोक ॥ एषां घोषनिवासिनामुत भवान् किं देव रातेति नश्चेतो विश्वफलात् फलं त्वदपरं कुत्राप्ययन्मुह्यति ॥ सद्वेषादिव पूतनाऽपि सकुला त्वामेव देवापिता यद्धामार्थसुहृत्प्रियात्मतनयप्राणाशयास्त्वत्कृते ॥ अर्थ — हे देवा, श्रीकृष्णा, या गोकुळवासी लोकांना तूं काय फळ देशील? हा विचार करतांना आमचें मन सर्व ठिकाणीं फिरून शेवटीं मोहांत पडतें. कारण सर्व फळांत श्रेष्ठ फळ काय तें तूंच, मग तुजवांचून त्यांस देण्यासारखें कांहीं दुसरें फळ नाहीं. याकरितां त्यांचें

ऋण तुझ्यावर राहणार आहे. आपण म्हणाल त्यांनां मी आपलें सायुज्य दे-
ईन, आणि ऋणमुक्त होईन, तर त्यानेंही ऋण फिटणार नाहीं, कारण
पूतनाही साध्वीचा वेष मात्र धरून तुला मारण्याकरितां आली होती.
तिलाही तूं तिच्या स्तनांतील विष प्राशन करून सायुज्य मुक्ति दिली-
स. मग तीच जर गोपगोपींनां दिली तर त्यांत काय अधिक आहे?
आपण म्हणाल, त्यांच्या सर्व कुलांस व इष्टमित्रांसही सायुज्य मु-
क्ति देईन. तर पूतनेलाही तिच्या कुळासकट म्हणजे अघासुर बका-
सुर यांसहित मुक्त केलें. मग तसेंच गोपगोपींस केल्यांत कांहीं अधि-
क नाहीं. आतां आपण म्हणाल कीं, म्हणूनच मी त्यांच्या पुत्रादि रू-
पानें वागून त्यांस निरतिशय सुख देत आहे. तर ज्या गोपगोपींनीं आप-
लीं घरें, द्रव्य, इष्ट, मित्र, देह, पुत्र, प्राण आणि अंतःकरण हीं सर्व तु-
ला अर्पण केलीं आहेत. असें अकृत्रिम प्रेम ठेवणारे जे व्रजवासी त्यांस
आपण कपटानें पुत्रादि रूप होऊन सुख दिलें तरी त्यांच्या निर्मल व निर्हे-
तुक भक्तीचें ऋण फिटणार नाहीं. याकरितां हे भगवन् तुह्मीं सर्वथा त्यां-
चे ऋणी आहां. तात्पर्य—साक्षात् भगवान् जर ऋणी आहे तर त्यांचें
भाग्य व सुख काय वर्णन करावें? ह्मणून तुकाराम म्हणतात ॥ गोकु-
ळींच्या सुखा०॥ त्या गोकुळांत नंदगृहीं श्रीकृष्ण जन्मल्यामुळें ल-
क्ष्मीचें वास्तव्य घरोघरीं झालें. याविषयीं कवि म्हणतात ॥ आर्या ॥
नारायणएकस्मिन् नंदगृहे नंदनंदनो न्यवसत् ॥ निलये निलयेलक्ष्मी
र्गोष्ठे त्वंभोधिनंदिनी ववृधे ॥ ४ ॥ अर्थ ॥ गोकुळांत एका नंदाच्या घ-
रींच श्रीकृष्ण वास्तव्य करिता झाला. परंतु समुद्रकन्या जी लक्ष्मी
ती गृहागृहाचेठायीं वरचेवर वृद्धिंगत होत चालली आहे ॥ आर्या ॥
वामनपणीं अदितिला कौसल्येला नजें नृपाळपणीं ॥ तेंसुख गोपींला-
देशतदा दिवसांत देव बाळपणीं ॥ ५ ॥ अर्थ—पूर्वी वामनावतारांत अदितिला (देवमातेला)
किंवा रामावतारीं कौसल्येला जें सुख दिलें नाहीं तें सुख श्रीकृष्णानें बा-
ळपणीं ज्या यशोदेला दिवसांतून शंभर वेळां द्यावें. तिचें भाग्य किती
वर्णन करावें. याचप्रमाणें इतर गोपींनांही. नारायणांनीं अत्यंत सुख दि-
लें त्याचें वर्णन शेषासखुद्धां करतां येणार नाहीं. याविषयीं लीलाशुकम्ह

णतात ॥ ॥श्लोक॥ पुष्पिता० ॥ परमिमसुपदेशमाद्रियध्वंनि गमेवनेषुनितांतचाररिवन्नाः॥विचिनुत भवनेषु बल्लवीनामुपनिषदर्थ मुलूखले निबद्धं॥५॥अर्थ– कवि मुमुक्षुजनांस उद्देशून म्हणतात. बापानों, तुह्मी निगमवेद्य वस्तूचें ज्ञान व्हावें ह्मणून वेदहींच कोणीए- क वनें यांत अतिशय परिभ्रमण करून थकलेले आहां. याकरितां तु- ह्मांला एक अत्युत्कृष्ट उपदेश मी सांगतों. याचा आदर करा. तो कोणता म्हणाल तर ह्या वेदांचे शिरोभाग जीं उपनिषदें त्यांतील मुख्य प्रतिपा- द्य जो अर्थ तोच गोकुळांत गोपीचे घरीं उखळाशीं बांधला आहे. ते- थेंच तुम्हीं शोध करा म्हणजे तुम्हाला मिळेल. तात्पर्य पूर्णब्रह्म सगु- णरूपानें रात्रंदिवस जेथें क्रीडा करीत आहे त्या गोकुळवासी लोकां- चे सुखाला अंत व पार नाहीं. ह्या आशय मनांत आणून तुकाराम म्ह- णतात. गोकुळींच्या सुखा०॥ एवं सर्व गोकुळवासी लोकांच्या सुखा- ला अंत पार नाहीं. त्यांत विशेषेंकरून यशोदानंद यांचें भाग्य तर व- र्णन करण्यासही अशक्य आहे. कवि म्हणतात ॥आर्या॥ यद्रोमरं- ध्रपूर्तौ वभवन्समापि जलधयो शक्ताः॥ तन्नंदगोपपत्नी स्नापयतिस्वां- जलिस्थतोयेन॥६॥ अर्थ– ज्या परमेश्वराच्या एका रोमरंध्राची पूर्ण- ता करण्याविषयीं सात समुद्रही समर्थ नाहींत. त्याला नंदपत्नी य- शोदा आपल्या ओंजळींतील पाण्यानें नाहूं घालत्ये. काय आश्च- र्य आहे? तसेंच ॥आर्या॥ यस्येतु नामोच्चारात्कालोपिहि बाधतेनै भक्तजनान्॥जनदृग्भीत्याजननी तस्य कपोले व्यधात्मषीतिलकम्॥२॥अर्थ- काळही ज्याच्या नामोच्चारास भिऊन भक्तजनांस पीडा करीत नाहीं. त्या- च्या गालास, लोकांची दृष्टि लागूं नये म्हणून यशोदा काजळानें बोटला- वत्ये. पहा भगवंतांनीं भक्तांकरितां आपलें महत्व सोडून मानुषनाट्या- नें अनेक बाललीला कौतुक ज्या गोपगोपींस दाखवून अतिशय सुख दिलें. त्यांचें तें सुख खरोखर अनंत अपार आहे. म्हणून तुकाराम म्हणता- त ॥ गोकुळींच्या सुखा ॥ अंतपार नाहीं देखा॥१॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल॥ पार्वतीपते हरहर महादेव॥ जानकीजीवन स्मरण॥१॥ आतां नारायणांनीं गोपगोपींस सुख देण्याकरितां कोणकोणतीं चरित्रें के-

ळीं तीं समजण्याकरितां कवि कांहीं बाललीला वर्णन करून गोपाल कालाचरित्र वर्णन करितात.

## गोपालकाला.

**साकी** ॥ आनंदें करि नंद सुतोत्सव देइ द्विजां गोदानें ॥ विप्र दरिद्रा, तैल हरिद्रा लावि पशुसि मोदानें ॥ १ ॥ हरि जननी व्रजजन हरिखनि बहुन स्मरती घरदार ॥ दारसहितनिज सदनिं येति त्या पूजी नंद उदार ॥ २ ॥ दहि दुध लोणी परस्परांवर उधळिति शिंपिति गोळी ॥ रुचिराभरणें वसनें धरिती जयिं प्रगटे सुरमोळी ॥ ३ ॥ श्लोक ॥ वसंततिलका ॥ ये रीकडे स्वसुत ठेवुनि नंदकन्या ॥ नेली तिलाहि धरि कंसमतीन अन्या ॥ जों आपटी तंव निघोनि नभींच गेली ॥ देवी वदे परिसतां मति मूढ ठेली ॥ ४ ॥ **आर्या** ॥ नष्टा सज मारुनि फळ काय तुझा काळवेगळा आहे ॥ कोठें तरि वादतसे वधिल तुला उक्ति मनिं धरीं गा हे ॥ ५ मग कंसें माराया शिशु निर्दश कीं अनिर्दश खळानें ॥ आज्ञापिले स्वसेवक दनुज तदा मृत्युभीत चपळानें ॥ ६ ॥ भव्यस्वरूप घेउनि कपटें तों पूतना व्रजीं आली ॥ व्याली परीस उग्रा जी केवळ मृत्युचीसयें आली ॥ ७ ॥ दे उग्र विषरस स्तन अंकीं घेउनि लोकपाळाला ॥ हा त्या वदनीं घाया आला रस काय हो कपाळाला ॥ ८ ॥ यज्ञपति विष म्हणे ना झांकुनि नयनें जगज्जनक थानीं ॥ रुचि आणुनि पी तिस दे अमृत म्हणुनि वधिले जनक थानीं ॥ ९ ॥ वपु पुष्प दाम सें तें गुरु होतां अंकपीडिता आर्या ॥ भी भूमीवरि ठेवी मग जों कांहीं गृहीं करी कार्या ॥ १० ॥ ते व्हांचि कंसहितकर दुष्ट तृणावर्त दैत्य ने त्यातें ॥ विश्वाच्या ब्रह्म्याच्या प्रबळा काळाचियाहि नेत्यांतें ॥ ११ ॥ यमभट शताभ्यधिक खळ गेला गगनीं अशांत हरि त्यातें ॥ गरुता स्वीकारुनि धरि हृदकंठीं आपणासिं हरि त्यातें ॥ १२ ॥ न सुटे मिठी न चाले बळ खळ बळहीन जाहला रडला ॥ स्वनयनयुगसह हरखर शरह तपुरसा शिळातळीं पडला ॥ १३ ॥ **ओंवी** ॥ तेथें एकदां गर्गमुनी ॥ वसुदेवाचें संमत घेउनी ॥ आ

---

१ सर्पिण. २ सखी. ३ मोक्ष. ४ हार. ५ जड. ६ शास्त्यास. ७ योद्धे. ८ तीक्ष्ण. ९ दगडाखालीं.

ले तयां नंद नसुनी॥ जातक करवी गुप्तस्थळीं॥ १४॥ आर्या॥ स्कन्न
स्थापी एका संकर्षण राम बळ अशीं नावें॥ तो कृष्ण वासुदेव प्रमुख
बहु दुजा सुतास सद्भावें॥ १५॥ साकी॥ देतिल अति सुख जन गो
द्विज सुखसंगोपुनि धर्मातें॥ स्थापुनि भुवनत्रयिं यश करतिल अति
अद्भुत कर्मातें॥ १६॥ आर्या॥ नवपल्लव मृदुकर पद विभु रांगति कर्द
मांत ही तुच्छें॥ वत्सांची अवलंबुनि ते जगदवलंब चालती पुच्छें॥ १७॥ गह्लीं
चुंबिति भेटति नाचविति. सुशब्द पढविती ब्रह्मा॥ गोपी शिकविति न-
तियति पतिमति रतिदा यदात्मज ब्रह्मा॥ १८॥ अभंग॥ मेळवुनि
सोंगडे सांगतो तयांस॥ चलारे गोरस देतों तुम्हां॥ १९॥ ओंवी॥॥
घ्यारे सामग्री चोरवट॥ खडे सराटे काठ्या नीट॥ माज बांधारे बळक
ट॥ शब्द कटकट न करावी॥ २०॥ वस्त्रगाळीव मृत्तिका॥ घेऊन प्र-
वेशा शंकू नका॥ सकळ गृहींचा आवांका॥ मज ठाउका असेची॥ २१
भीतरीं प्रवेशोनि येकीकडे॥ सव्यापसव्य टाकावे खडे॥ पात्र वाज-
तां कडाडे॥ जावोनी शेकडें आणावें॥ २२॥ सांचल ऐकतां गवळणी
॥ वेगें येतील धांवोनी॥ तंव सराटे पसरारे अंगणीं॥ पाय चुबकोनी
गुंतती॥ २३॥ तेही चुबकोनी येती बाळा॥ तंव मृत्तिका टाकावी डोळां
॥ नेत्र चोळती तंव पळा॥ नवल कळा सांगीतली॥ २४॥ अभंग॥ गे-
ली असे एक गोळणी जळाला॥ सांगती गोपाळां तेथें जाऊं॥ २५॥
॥ पद॥ सख्या हरी चोरी चालकरूं॥ ध्रु०॥ पालथिलें गृह गोरसपु-
ष्कळ॥ गोप मिळोनि हरूं॥ १॥ दधि भरणीसी टोंचुनियां तळीं॥ वदनीं
धार धरूं॥ २॥ उद्धव चिह्न अद्वय गोरस॥ उरलें अंग भरूं॥ ३॥ २६
॥ श्लोक॥ संपूर्ण भाग्योदय होय जीचा॥ तीच्या घराये सुत नंद-
जीचा॥ जो चिंतनें सर्व भया हरी तो॥ ऐका पुढें काय करी हरी तो॥
॥ २७॥ अभंग॥ कोणी पिती दूध कोणी खाती दहीं॥ आली लवला-
हीं गवळीण॥ १॥ नपूरेची हात दूध शिंक्यावरी॥ करावें मुरारी काय येथें
॥ २॥ पादावरी पाद रची वनमाळी॥ पाडीतसे डूळी मूरलीनें॥ ३॥ बडबू-
निदोरी नाचतसे पेंदा॥ भलीरे गोविंदा युक्ती केली॥ ४॥ उदालेल्या वेत्या
तुळू नसो दल बला॥ थंबालीरे गोला लोनी याचा॥ ५॥ गोपी अहर्निशीं ज-

पे धरायासी॥ आतां कैसा जासी चोरटिया॥ ६॥२८॥ श्लोक॥ तदा माधवें अंतरीं आठवीलें॥ सुरवीं दूध होतें बहू सांठवीलें॥ मुकुंदास गोपी धराया निघाली॥ तिच्या लोचनीं दुग्ध फुंकोनि घाली॥२९॥ कडे घेउनी कृष्णनाथा उदारा॥ गृहद्वारदेशीं उभी नंददारा॥ मिळे बायकोमात्र तेथें व्रजाची॥ म्हणे पुत्र तूझा अगे ती व्रजाची॥३०॥ कडे तूझिया दीसतो साधु हागे॥ सुते उंबरा आमुच्या आणि हागे॥ पडे नेणतां पाय हो त्याचिमाजी॥ करी हास्य तेव्हां मुलींच्या समाजी॥३१॥ पद॥ यशोदे बाई॥ गाऱ्हाणीं सांगूं काई॥ ॥ध्रु०॥ माझे सुनेसि चाळवीलें॥ कुंजवनामाजी नेलें॥ म्हणोनी[1] म्यां दटावीलें॥ फोडिली डेई॥१॥ दुसरी सांगे घरासि आला॥ कोणा नाहीं तेव्हां[1]प्याला॥ संचित गोरस माझा व्याला॥ सोडिल्या गाई॥२॥ ऐसें बाटे माझे जिवें॥ तुझ्या नगरा सोडुनि जावें॥ शिवदिन म्हणे लागे भावें॥ केसरीपायीं॥३॥ श्लोक॥ मातेसही बोलतसे हरी तो॥ तीचें तयांचें मन जो हरीतो॥ माते म्हणे हें लटिकेंचि सारें॥ याबायकांचीं वचनें असारें ॥३२॥ पद॥ अयि मा शृणु तन्मात्रास्ति तथ्यवाक् का ऽपि॥ मजवरि हे पें घेतात तुफानें गोपी॥ ध्रु०॥ किं दारिद्र्यं मम सद्मनि यत् प्रचुरामि॥ भोजनाकरितां कीं नित्य पयः प्रचुरामी॥ गोक्षुरहेतोः किं पंगूर्गा विदधामि॥ किति ल्हाचर ही पसरिले म्हणाति जी धामीं॥ दधि नवनीतं बत पीतं नच पश्यामि॥ कशिं हीं तुफानें उठविति या मेघ श्यामीं॥ जातुचिदहमपि वद मातः किमसत्लापी॥ मजवरि हे०॥३४॥ अयि मा०॥ अप्यधिरथ्यं क्रीडतः कंदुकं सा मे॥ लेके छुपावत बिन दर्द जलद चोली मे॥ गतवति याता मयि सदनं कंदुककामे॥ द्वार लगाके चिप झूट बैगी न्हानीमें॥ अहमभयो ऽगामन्यतो दिनांतिमर्यामे॥ चेंडू ले आयो तकसीर किसीकी इसीमें

---

१ आई तें कांहीं तूं ऐकूं नकोस. कांकीं यांत खरें बोलणारी कोणीं नाहीं. २ आई माझ्याघरीं दारिद्र्य आहे काय? म्हणून मी चोरी करीन. ३ यांत गोक्षुर म्हणजे सरांटेदारीं पसरितो असें गोपींचें म्हणणें. कृष्ण गोक्षुर याचा गायींचे खूर असा अर्थ करून म्हणतो कीं मी गोक्षुराकरितां आपल्या गायी लंगड्या करतों की काय? ४ अयि यशोदे, दहीं, लोणी, दूध हें पीतं म्ह० पिवळें कधीं मी पाहिलें नाहीं. गोपींच्या वाक्यांत पीतं प्याला असा अर्थ आहे. ५ हे मातः मी कधींतरी असत्य भाषण करतों काय? सांग. ६ मी रस्त्यावर खेळत असतां माझा चेंडू ती गोपी— ७ मी आपला चेंडू घेण्याकरितां तिच्याकडे गेलों असतां ती माझ्यापुढें घरा-

॥ नमृषाब्रूयां व्रजजने सदाऽस्यनुकंपी॥ भजवरि०॥२॥ अयि०॥ यमुनातीरं यांतं मां काऽपि वधूटी॥ कहे मोहन जी मेरी नजर तुम पर बैठी॥ दश दशन-छदमिदमपरा प्राह स्केकंठी॥ कोणी म्हणे घरि ये देइन दुधाची वाटी॥ अं-बेकं मां गोपीनाम गृणोत्कोर्षी ॥ कोइ कुच्छु कोई कुच्छु बोली ये बातन झूटी ॥ वामनभावं दृष्ट्वा कुर्मामसि पापी॥ भजवरि हैं पें घेतात तुफानें गोपी॥ ३५

अभंग॥ येके दिनीं सायंकाळीं॥ नंदा पुसे वनमाळी॥ १॥ उद्यां जाई-नमी राना॥ घेवोनियां गोधना॥ २॥ ३६॥ पद॥ मनमोहन मुरलीवाला॥ हृदयीं आला॥ ध्रु०॥ रुचली उच्च घोंगडी त्याला॥ प्रियकोमळ तुळसी-च्या पाला॥ चारित वृंदावनिं वत्साला॥ वाटे प्राणसखा हा चिमण्या गो-पमुलाला॥ मनमोहन मुरली०॥ १॥ गोरस गोपवधूंचे प्याला॥ ढेंकर दे-उनि उदरीं घाला॥ चिन्हें शुभ्र दिसति अधराला॥ त्याकुनि वरि कलगी नवरा खुलला गुच्छाला॥ मनमोहन०॥ २॥ पाहुनि वत्स व्रजवनितांला॥ कर-तळिं ठेवित दहिं भाताला॥ अंगुलिकांवरि शाकफळाला॥ कारवे वेतादी हरि खोंवित जठरीं वंशाला॥ मनमोहन०॥ हृदयीं०॥ ३॥ पाहुनि श्रीस-द्भागवताला॥ आशय पुसुनि बरा संताला॥ भूतमात्रीं भगवंताला॥ पाहतां अमृतेश्वर हरि अथवा एकचि झाला॥ मन०॥ हृद०॥ ४॥ ३७॥

घनाक्षरी॥ उपर एक समे शाम॥ धरे खेलनका काम॥ लिये गोवलसह राम॥ जमुनाधाम पारहा॥ १॥ ३८॥ श्लोक॥ वामनी॥ भुजंगप्रयात ॥ ह्मणे कृष्ण त्या बाळसंताप हारे॥ अरे या स्थळीं सर्व संताप हारे॥ करी ठाव खेळाचिया संपदा हा॥ जया बाळवंदीं घडे संपदा हा॥ ३९॥ पहा हे महा शीतळ स्वच्छ वाळू॥ रुचे अन्न येथें क्षुधा तुच्छ वाळू॥ पहा साउली दाट केवीं द्रुमाची॥ नव्या पल्लवीं श्री पहा विद्रुमाची॥ २ ॥ ४०॥ शार्दूलविक्रीडित॥ झाडें पुण्यफळें करूनि सुफळें केलीं ब-

---

सगेलो. ८ मग मीहि दिवस महरभर होता म्हणून निर्भयपणें दुसऱ्या वाटेनें तिच्या घरीं गेलों.
१ मातुश्री मी कधींही खोटें बोलावयाचा नाहीं. आणि गोकुळांतील सर्व लोकांवर माझी कृपा आहे. २ मी यमुना तीरावर क्रीडा करण्यास गेलों असतां कोणी एक स्त्री.
३ दुसरी म्हणाली कृष्णा, माझ्या ओंगस तूं चाव. ४ आई, याप्रमाणें मला एकट्याला कोठ्यावधी गोपींनीं वेढा घातला. ५ मी लहान आहें असें पाहून गोपी मला म्हणाल्या कीं, कृष्णा, तूं पापी आहेस.

ळीं पोफळें ॥ नारळें सजळें विचित्र उजळें हीं रम्य सीताफळें ॥ तैसीं हीं प्रबळें स्वसंचितबळें जीं तुंबळें जांबळें ॥ पुष्पें हीं विमळें अशोकबकुळें कुंदादिकांचीं कुळें ॥ ४१ ॥ दिंडी ॥ कृष्ण बोले गोपाल बालकांतें ॥ बसुनि येथें अजि करूं भोजनातें ॥ वत्स सोडा वनि चरावया पाणी ॥ तया पाजुनियां म्हणे चक्रपाणी ॥ ४२ ॥ बरें बोलसी कृष्णा जी तूं जसारें ॥ तसें वर्तुं निं लक्षितो तूजसारें ॥ असे जेविनिसोडून वासरांतें ॥ नभीं झालें आश्चर्य तें सुरांतें ॥ ४३ ॥ द्रुतवि० ॥ श्लोक ॥ बहु खुजे अति वामन होगडी ॥ तनु जशा भवसागर सांगडी ॥ स्वनिकटत्व तयां बहु देवदे ॥ कवळ दे निजगम्य तयां वदे ॥ ४४ ॥ आर्या ॥ व्रज बालकदळभागीं केशव कोशस्थळीं विराजतसे ॥ तें यमुना पुलिन नलिन कृत्रिम परिरुचिर नजळ कंज तसें ॥ ४५ ॥ तेथें पाजुनि पाणी वत्सचरायासिं सोडिले जवळी ॥ पुलिनीं बसूनि भोजन करि हरि घेऊनि पंक्ति लागवळी ॥ ४६ ॥ श्लोक ॥ भुजंगप्र० ॥ असे कर्णिकीं अंबुजामाजि जेवीं ॥ सुलां मध्य भागीं बसे कृष्ण जेवी ॥ मुखीं ग्रास सप्रेम उल्लास होतीं ॥ दहीं भात हे देवलीला पहाती ॥ ४७ ॥ आर्या ॥ सुख काय तें वदावें प्रथम ब्रह्माचिया मुखीं कवळ ॥ घालिति मग आपुलिया चाखिति रस तेहि जो तयांजवळ ॥ ४८ ॥ देती मिटक्या दाविति अन्योन्य स्वस्वभोज्य रुचिरमती ॥ हांसति भोजन करितां हांसविति प्रभुसि गोप रुचिरमती ॥ ४९ ॥ वामकरीं दध्योदन अंगुलिसंधींत लवण शाक फळें ॥ धरिशृंगवेत्रकक्षीं जठरपटीं वेणु भक्तभाग्यबळें ॥ ५० ॥ यज्ञाचा भोक्ता करि भोजन घेऊनि पंक्तिला बाळ ॥ दूरुनि अवलोकुनि तें ब्रह्मादिक देव घोटिती लाळ ॥ ५१ ॥ श्लोक ॥ भागवत ॥ मंदाक्रांता ॥ बिभ्रद्वेणुं जठरपटयोः शृंगवेत्रे च कक्षे वामे पाणौ मसृण कवलं तत्फलान्यंगुलीषु ॥ तिष्ठन्मध्ये स्वपरिसुहृदो हासयन् नर्मभिः स्वैः स्वर्गे लोके मिषति बुभुजे यज्ञभुक् बालकेलिः ॥ ५२ ॥ शार्दूलवि० ॥ वंशीनादनटी तिला कटितटीं खोवूनि पोटीं पटीं ॥ कक्षे वामपुटीं स्वशृंग निकटीं वेत्रादि ही गोमटी ॥ जेवीं नीरतटीं तरुतळवटीं श्रीशाम देहीं उटी ॥ दाटी व्योमघटीं सुरांसुरव

१ तट. २ कमळ. ३ कमळ.

लुटी घेती जटी पूर्जटी ॥ ५३ ॥ **श्लोक** ॥ वामनी ॥ स्वागता ॥ वत्ससर्व शुक भागवतांत ॥ श्रीपती स्वशिशु भागवतांत ॥ जेवि तो म्हणनि भागवतांत ॥ स्वात्मतारस विभागवतांत ॥ ५४ ॥ ॥ **कृष्ण अरण्यांत असतां गोपींची उक्ती** ॥ **पद** ॥ धांव धांवबा धांव सांवळ्यारे ॥ दावि दावि पाय तुझे करिशि काय असूनि गोंवळ्यारे ॥ ध्रु० ॥ गोपिकाजन प्राणवल्लभारे ॥ मयूरपिच्छ धरिशि शिरीं श्रवणिं गुंज मुक्त पोंवळ्यारे ॥ धांव धांव० ॥ १ ॥ व्रजशिशूंसवें ग्रास भक्षिसीरे ॥ वृंदावनिं जाउनियां वळिसि गायि नीळपींवळ्यारे ॥ धांवधांवबा० ॥ २ ॥ कृष्ण तनुजहा विनविती तुलारे ॥ धरुनि हात दावि वाट मायबाप कुता आंधळ्यारे ॥ धांव धांव० ॥ ३ ॥ **पद** ॥ गोधनें चारितां दाविती शक्ति ॥ हुतुतू हमामा घालुनी घेती कुस्ती ॥ ध्रु० ॥ एक नाचती बिलगती थउक्या देती ॥ एकमेकां मानेंत बुक्या देती ॥ १ ॥ एक जानूचें मांदळ वाजवीती ॥ एक नाकींचे चंग धुधुकार करिती ॥ २ ॥ **हमामा** ॥ हमामारे पोरा हमामारे ॥ ध्रु० ॥ हमामा घालीं सोई ॥ फोडिन तुझी डोई ॥ १ ॥ हमामा घालीं नेटें ॥ मोडिल तुझीं बोटें ॥ २ ॥ फुगडी दोन हातांची ॥ लई लई लाखोटा ॥ माझा भाऊ गोमटा ॥ १ ॥ भावा शरण गेलिये ॥ सुखरूप जालिये ॥ २ ॥ भाऊ माझा वडील ॥ मजला मोती घडील ॥ ३ ॥ प्रेमतान्हें भावाचें ॥ पडिये माझ्या जिवाचें ॥ ४ ॥ महावाक्य गूज गे ॥ केशव सांगे तूज गे ॥ ५ ॥ **फुगडी उभ्याची** ॥ फुगडी फूगे ॥ मागेंपुढें थूगे ॥ १ चिदानंदीं रंगे ॥ साधूचेनि संगें ॥ २ ॥ देहमदें फूगे ॥ भाग्यमदें फूगे ॥ ३ विषयमदें फूगे ॥ तिच्या तोंडा थूगे ॥ ४ ॥ **जातीण** ॥ **अभंग** ॥ फूगडी फूगडी खेळताती गडी ॥ लोटिताती घडी सार्थकाची ॥ १ ॥ देऊडे ते कर धरिती करानें ॥ चरणिं चरण जोडिताती ॥ २ ॥ प्रेमाच्या भरानें फिरती गरगरां ॥ फुंकिती फुंकारा सुखरस ॥ ३ ॥ **पिंगा** ॥ घाली पिंगा बाळे ॥ सांडी विषय चाळे ॥ १ ॥ कामसंगा सोडी ॥ माजबोरी मोडी ॥ २ नाहीं समाधान ॥ हालवूं नको मान ॥ ३ ॥ सोहं प्रेम बोधें ॥ केशवीं ब्रह्मानंदें ॥ ४ ॥ **लपंडाव** ॥ अभंग ॥ मिळोनी सकळ हरीचे सांगाती ॥ प्रीतीनें खेळती लपंडाव ॥ १ ॥ लाभाच्या विंदानें पळती फिरती ॥ पायांत शिर-

ती एक मेका ॥ २ ॥ फेंतोनी पडली मायेच्या पाउलीं ॥ लपतां जालीं हिंपुटीं हो ॥ ३ ॥ कैसी खेळों लपंडाई रे कान्होबा ॥ पद ॥ चेंडू ॥ झेलारे झेला वरच्येवरी झेला ॥ ध्रु० ॥ वृत्तिशून्य गोळा करिति गोपाळ ॥ मांडीयेला खेळ ॥ वृंदावनीं ॥ १ ॥ गोपाळांचे वृंद चेंडू ते खेळती ॥ हरीचे लोळती अंगावरी ॥ ॥ २ ॥ भूमीसी टाकुनी उडवीती अंतरीं ॥ वरिचा वरी करीं धरीताती ॥ ३ हरीचे पृष्ठीसी बैसती आपण ॥ कमठस घन पृष्ठी ज्याची ॥ ४ ॥ टिपरी ॥ अभंग ॥ प्रेमाची टीपरी भावानें घेवोनी ॥ म्हणावें वदनीं नामसार ॥ १ ॥ उद्धाराचे टोले दणादण हाणा ॥ दणादण जाणा माराउड्या ॥ सिंभिमातीरीं येक वसलें नगर ॥ त्याचें नांव पंढरपूर ॥ १ ॥ नंतर दहींहंडी फोडावी ॥ अस्तु याप्रमाणें वृंदावनांत व गोकुळांत अनंत लीला करून गोपींस व गोपांस व लहान मुलांसही भगवंतांनीं अत्यानंद दिला. असे श्रीकृष्णाचे निरंतर सहवासी जे गोकुळचे लोक त्यांच्या सुखाला अंत पार नाहींत. या अभिप्रायानें तुकाराम म्हणतात ॥ गोकुळींच्या सुखा ॥ अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ हेंचि दान देगा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥ गुण गाईन आवडी ॥ हेचि माझी सर्व जोडी ॥ नलगे मुक्ति धनसंपदा ॥ संतसंग देगा सदा ॥ तुका म्हणे गर्भवासीं सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥ ॥ आरती कृष्णाची ॥ ॥

ओंवाळूं आरती मदनगोपाळा ॥ श्यामसुंदर गळां वैजयंतीमाळा ॥ ओंवा० ॥ ध्रु० ॥ चरणकमल ज्याचे अतिसकुमार ॥ ध्वजवज्रांकुश ब्रीदाचा तोडर ॥ ओंवाळूं आरती मद० ॥ १ ॥ नाभीकमळीं ज्याच्या ब्रह्म्याचें स्थान ॥ हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥ ओंवाळूं० ॥ २ ॥ सुखकमळ पाहतां सूर्याच्या कोटी ॥ मोहियेलें मानस कोंदियेली दृष्टी ॥ ओं० ॥ ३ ॥ जडित मुकुट ज्याचा देदीप्यमान ॥ तेणें तेजें कोंदलें अवघें त्रिभुवन ॥ ओंवाळूं० ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देखियेलें रूप ॥ रूपचि पाहों जातां झालें तद्रूप ॥ ५ ॥ ओंवाळूं आरती मदनगोपाला० ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेतत् ॥ १ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं ॥ कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीना-

यकंरामचंद्रं भजे॥२॥पुंडलीकवरदे हरिविठ्ठल॥पार्वतीपते हरहरमहादेव॥जानकीजीवन स्मरण॥जयजय राम॥ श्रीकृष्णाजीकी जय॥ इति गोपालकालाख्यानं समाप्तम्॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

## कथा १२ वी.

## पूर्वरंगनिरूपणम्.

श्रीमन्महागणाधिपतयेनमः॥ अविरलमदजल० इत्यादिमंगलाचरणम्॥रामचंद्रमहाराजजयजयरामचंद्रमहाराज॥ इतिभजनम्॥पुंडलीकवरदेहरिविठ्ठल॥पार्वतीपते हरहरमहादेव॥ जानकीजीवनस्मरण जयजयराम॥ अभंग ॥ऐशा दात्या विसरावें॥ तोंड कोणापसरावें ॥ध्रु०॥तोहा लक्ष्मीचापती॥ सर्वसुखाची विश्रांती॥१॥ ऋद्धिसिद्धी ज्याच्या दासी॥ भक्तिमुक्ति पायांपाशीं॥२॥ तुका म्हणे साई॥ राहीं पुरोनियां पायीं॥३॥ पुंडलीकवरदेहरिविठ्ठल॥ पार्वतीपतेहरहरमहादेव॥ सीताकांतस्मरण॥जयजयराम॥आदौकीर्तनारंभीं भगवत्प्रिय, भक्तचूडामणि तुकारामाख्य साधु हे प्रभूची अनुपम दातृत्वशक्ति मनांत आणून आणि सर्व प्रकारें दीनअशा या किंचिज्ज्ञजीवांची रात्रंदिवस अंतःकरणांतील अतृप्तिमूलक तळमळ पाहून यांनीं एक लक्ष्मीपती जो नारायण त्यासच शरण जावें म्हणजे सर्व कामना पूर्ण होतील असा विधिव्यतिरेक मुखानें स्वकृत अभंगांत प्रतिपादन करतात ॥ ऐशा दात्या विसरावें ॥ तोंड कोणापसरावें॥ बापानों, ज्याच्या मनांत वैषम्य कधींच नाहीं. शत्रुत्वानें अथवा मित्रत्वानें गणाऱ्यांसही जो सद्गतीच देणारा, ज्याच्या औदार्यासही जगांत तुलना नाहीं, जो अक्षय्य षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा दात्याला (श्रीनारायणाला) जर विसरावें? तर कोणापासून इच्छा तृप्त होणार? तर नारायणावांचून याच्या करण्यास अन्य स्थलच नाहीं. भगवंतानें दातृत्व वैषम्य विवर्जित आहे याविषयीं भागवतीं शुकाचार्य म्हणतात॥श्लोक॥ अहो बकीयं स्तनकालकूटं जिघांसयाऽपाययदप्य

साध्वी॥ लेभेगतिंधात्र्युचितांततोऽन्यं कंवा दयालुं शरणं व्रजेम॥ १॥
॥अर्थ॥ अहो आश्चर्य॥ यद्यपि असाध्वी दुष्ट अशी पूतना श्रीकृष्णा-
ला मारण्याच्या इच्छेनें स्तनसंबंधीं कालकूट ह्मणजे विष पाजिती
झाली. तथापी मातेला योग्य जी गति ती ज्या श्रीकृष्णापासून ति-
ला प्राप्त झाली. त्यावांचून अन्य कोण दयाळू आहे? कीं त्याला आ-
ह्मीं शरण जाऊं? तात्पर्य, श्रीकृष्ण हाच दयाळू व सर्व देण्यास समर्थ
आहे. त्यावांचून कोणाला याच्या करावी? याअभिप्रायानें तुकाराम
म्हणतात ॥ ऐशा दात्या वि०॥ आतां प्रभूनें आपल्यास काय दिलें आ-
हे म्हणाल तर पहा, सर्व पुरुषार्थोपयोगी हा देह परमेश्वरानें दिला
आहे ही देणगी काय सामान्य आहे; परंतु आपण जीव किती प्रमत्त
झालों आहों कीं त्या नारायणाचें स्मरणही आपण करीत नाहीं. या-
विषयीं कवि म्हणतात — श्लोक॥ दत्तो मानुष देह एष भगवंस्त्वत्तोषणं
नाचरन्॥ सत्तो यादिभिरर्हणैरस्तु दिनं यत्ताविलासो दिषु॥ वित्तोपास्ति
परोऽभवंनच भवेच्चित्तःकदा श्रीपते त्वत्तो नास्ति दयानिधिर्नरहरे मत्तो
नमत्तोऽधिकेः॥२॥ अर्थ — हे श्रीपते तूं मला हा अलभ्य नरदेह दिला आ-
हेस परंतु मी तुझ्या संतोष होण्यासारखें कधींही आचरण केलें नाहीं. त-
र उत्तमस्रक्गंधयुक्त पाणी मिष्ट भोजन इत्यादि विलासाविषयीं उद्युक्त होऊ-
न वित्तोपार्जन करण्यांत मात्र तत्पर राहिलों. परंतु तुझें चिंतन कधींच के-
लें नाहीं. तथापी तूं आमची उपेक्षा करीत नाहींस. यावरून तुझ्या सा-
रखा दयाळू कोणी नाहीं. आणि माझ्यासारखा दुसरा कोणी नत्त ना-
हीं.॥२॥ तात्पर्य परमेश्वरानें आपल्यास हा देह दिला आहे हीच ईश्व-
राची केवढी देणगी आहे याचा विचार केला असतां अन्य दाते अग-
दीं तुच्छ दिसतात. परंतु याचा उपयोग जीवांनीं विपरीत केला आहे
याविषयीं वेंकटाध्वरी म्हणतात — श्लोक॥ कुक्षिशल्यांग कृते ऽर्पितेन क-
रण व्यूहेन देहेनच स्वानर्थं बत जंतुरार्जयति चेन्मंतुर्नियंतुः कुतः॥
शस्त्रे शत्रुजयाय नेजगुरुणा दत्ते ऽथ तेनैव चेत्पुत्रो हंति निजं वपुः क-
थं परै तत्रापराधी गुरुः॥३॥ अर्थ — परमेश्वरानें सर्व दुःखांचा नाश
व्हावा म्हणून दिलेला जो इंद्रियसमुदाय, देह त्यांच्यायोगानें हा जी

व जर आपला अनर्थ संपादन करील तर यांत ईश्वराचा काय अपराध आहे? अहो, पित्यानें शत्रूंस जिंकण्याकरितां दिलेल्या शस्त्रानें पुत्र जर आपल्या शरिरावरच प्रहार करील तर त्याविषयीं अपराधी कोण? अर्थात् पुत्रच.॥ तात्पर्य - परमेश्वराच्या देणगीचा यथायोग्य उपयोग केला असतां प्राणी कृतकृत्य होतो यांत संशय नाहीं. अशा दात्याला सोडून इतरांजवळ तोंड पसरणें अगदीं अज्ञान आहे म्हणून तुकाराम म्हणतात - ऐशा दात्यावि०॥ याविषयीं एका कवीची उक्ति आहे ॥श्लोक॥ मोचारसवाचाकथमाचारविहीनान् काचानिव याचामि दुराचार समर्थान्॥ वाचामधिपाचार्य कवाचारस हीनान् माचालयमाचालय माचारुपदाब्जात्॥ ४॥ अर्थ - हे परमेश्वरा तूं सर्व वाणींचा अधिप जो बृहस्पति किंवा ब्रह्मदेव त्याचाही गुरु आहेस तर माझी प्रार्थना इतकीच आहे कीं, हे भगवन् मला तुझ्या सुंदर चरणकमलांवरून चंचल करूं नकोस. कारण तुजवांचून मी या केळीच्या (कदली फळाच्या) रसाप्रमाणें मधुर अशा वाणीनें आचारहीन व दुराचरणांत निष्णात असे कांचेप्रमाणें तुच्छ जे धनिक लोक यांस कसा याच्ना करूं? तात्पर्य ईश्वरावांचून अन्य कोणी दाता नाहीं. जे आहेत त्यांचें दान म्हणजे॥ शाकाय वास्याल्लवणाय वास्यात्॥ याप्रकारचें होय. याविषयीं कवींनीं चमत्कारिक वर्णन केलें आहे॥ श्लोक॥ संजल्पत्यसुदानजातकुतुकंजीमूतवाहं शिबेर्व्यर्थसंप्रतिपादनं नच कविप्रीत्येकु दानं बलेः॥ अर्थी हंत दधीचि भानुसुतयोरद्यापि सत्राशनोदातृत्वं धरणीसुतेश भवतो नाहं विजाने तथा॥ ५॥ अर्थ - असुदान म्हणजे प्राणदानाचे योगेंकरून ज्याला मोठें कौतुक वाटलें अशा जीमूतवाह राजाचें कांहीं लोक वर्णन करतात. परंतु श्लेषार्थानें कवि म्हणतो तें दान मोठें आश्चर्य मानण्याजोगें नाहीं. कारण मुळींच तें असुदान म्हणजे चांगलें दान नव्हे. तसेंच शिबिराजाचें जें दान तें व्यर्थच होतें. म्हणजे वि म्हणजे पक्षी तदर्थ होतें. याविषयीं भारतीं कथा आहे. शिबिराजानें सत्व पाहाण्याकरितां इंद्र व अग्नि श्येन आणि कपोत या पक्ष्यांच्या रूपानें त्याजवळ गेले तेव्हां कपोत राजास शरणागत होऊन म्ह-

णाला हा श्येन मला मारतो आहे. यापासून मला वांचीव. श्येनही म्हणाला माझें ईश्वरनिर्मितभक्ष्य मला दे. नाहींपेक्षां याच्या वजनाइतकें तूं आपलें मांस दे. त्यावेळीं त्या श्येनपक्ष्यास शिबानें आपलें मांस दिलें. श्लेषस्पष्टच आहे कीं, असेंही शिबीचें दान परंतु तें व्यर्थ म्हणजे निरर्थक होय. याचप्रमाणें बळीचें जें कुदान म्हणजे पृथ्वीदान त्यापासूनही कवींचा (शुक्राचा) संतोष झाला नाहीं. पक्षीं मुळींच कुदान (वाईट दान) त्यापासून कविसंतोष कसा होईल? आणखी दधीची ज्यानें वज्र करण्याकरितां आपल्या अस्थि देवांस दिल्या तो. तसाच कर्ण हे मोठे प्रसिद्ध दाते पण या दोघांचा याचक जो इंद्र तो अद्यापी सत्राशन म्हणजे यज्ञभाग भक्षण करणारा आहे. पक्षीं अन्नसत्रांत भोजन करणारा आहे. मग कसलें तें दातृत्व! याकरितां कवि म्हणतो हे धरणीसुतेश प्रभो रामचंद्रा, तुझें दातृत्व कसें आहे कीं, एक वेळ ज्यास तूं दिलेंस तो दुसऱ्याची याञ्चा करीत नाहीं. असें दातृत्व कोणासही नाहीं. हाच आशय मनांत आणून तुकाराम म्हणतात ॥ ऐशा दात्या विसरावें ॥ तोंड कोणां पसरावें ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहरमहादेव ॥ सीताकांतस्मरण जय जयराम ॥ सबसंतनकी जय ॥ पहा प्रभू रामचंद्र सिंहासनारूढ असतां प्रभूकडे अनेक याचक आले आणि त्या सर्वांचे मनोरथ प्रभूनीं पूर्ण केले. याविषयीं कवि ललिताख्यान निरूपण करितात.

## ललिताख्यान प्रा०

॥ अथ ललितपदानि लिख्यंते ॥ **अभंग** ॥ रत्नजडितसिंहासन ॥ वरी शोभे रघुनंदन ॥ १ ॥ वामांकीं ते सीताबाई ॥ जगज्जननी माझी आई ॥ २ ॥ पश्चाद्भागीं लक्ष्मण ॥ पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥ भरतशत्रुघ्न पाहीं ॥ चवरें ढाळिति दोहीं बाहीं ॥ ४ ॥ नळनीळ जांबुवंत ॥ अंगद सुग्रीव बिभीषण भक्त ॥ ५ ॥ देहबुद्धी सांडुन पाहीं ॥ दास अंकित रामपायीं ॥ ६ ॥ **भालदार** ॥ **पद** ॥ सुनस्कुन बेहया ॥ भालदारपदपाया ॥ ध्रु० ॥ लियारामनामका भाला ॥ कामक्रोध कुमार डाला ॥

सुन० ॥ १ ॥ रामनामका घोडा ॥ येतो तीन लोकमें बडा ॥ सुन० ॥ २ ॥ त्रि-
कुणशिखरपरजाना ॥ व्हांरामनामजपजपना ॥ सुन० ॥ ३ ॥ कहतकबी-
रसुनप्यारा ॥ चुकालेजन्ममरनकाफेरा ॥ ४ ॥ सुन० ॥ सद्गुरूधावामसा-
दनीझडकरी ॥ ध्रु० ॥ चोपदार ॥ कबित ॥ श्रीरामराजाकी सभा
घनदाट मजालस थाट भरपूर भरिहैं ॥ ब्रह्मा विष्णु शंकर चंद्र सुरज
गुरु व्यास ऋषी आये हे ॥ इंद्र सिंगासन बैठे अरुण वरुण ऋद्धिसि-
द्धिपवन चोकीदार खडे है ॥ ते हेतीसकोटी देव सुरनर गंधर्व यक्षना-
ग किन्नर मुनिजन वालखिल्य चोसष्ट जोगनी सहस्रकोटी कात्या-
यनी ॥ अष्टभैरव अष्टदिक्पाल खडे हे ॥ नारद तुंबर करत गायन उद्ध-
वा क्रूर प्रल्हाद भक्त बिराजे ॥ गणपत करे नृत्य शारदा संगिन गावे ब्रा-
ह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र अठरा बरनके थाट मिलकूं आवे ॥ वासुदेवदिं-
डीगाण बाळसंतोष जगत लगावे ॥ पांगुळ करे पुकार जोगी कनफ-
टा आवे फकिर बहित बैरागी ग्यान ध्यान गावे ॥ गोंधड गोंधली ग-
वालन श्रीकृष्णलीलागावे ॥ भुत्या वाघ्या नाचे डाकुलता होरा बत-
लावे ॥ सारमंडळ करे ख्याल केके आहिर आवे पंडित करे बिचार ॥ बा-
आगीर तुरगावे महार करे जोहार ॥ सब याचक प्रसाद मागनकुआ-
वे ॥ तन्हातन्हाके नृत्य गावे बजावे अनंत मजालसमों लोक प्रेमभरि-
त चरण भजावे तननं तननं धिगट धिगट धिमताल मृदंग बजावे कहे
प्रेमळदास करो गुरुबचनकी आस सुनो सुजन आदमसे कदम
तमाम चोपदार ललकारे ॥ बडिजाव महाराज ॥ पद ॥ हुकुमसाहेब
का २ मैंतो चोपदार उनका ॥ ध्रु० ॥ रामलछीमन भरत शत्रुघन सीता
माई देखा ॥ जांबुवंत हनुमान मिलाकर लूटदियी सब लंका ॥ हुकूम
॥ १ ॥ ब्रह्माविष्णुमहेश प्रभुका अवतार खासा ॥ इंद्रचंद्र और पावक भा-
स्कर वाचस्पति गुरुका ॥ हुकूम सा० ॥ २ ॥ दत्तगुरु यज्ञवल्की अगस्ती वि-
श्वामित्र देखा ॥ देव सनकादिक नारद तुंबर खडा रेहे अब तुका ॥ हुकूम
सा० ॥ ३ ॥ पद ॥ दालिबंद नोकर तेरा विठुजी मैं दालिबंद नोकर तेरा ॥ हर
दम मुजरा मेरा ॥ विठुजी० ॥ ध्रु० ॥ पांच हतियार एक बंध बांधु थाटथाट ब-
डु मेरा ॥ विठुजि० ॥ १ ॥ रामनामकी समशेर बांधू ॥ सारखूं दरवाजा तेरा ॥ वि

तुजी०॥२॥स्मरतनुरतका कोट बनाऊं॥ येही चाकर तेरा॥ वि०॥३॥ कहतकबीरा सुन मेरे लाला॥ हरदम मुजरा मेरा॥ वि०॥४॥ प्रसाद॥ पद॥ सद्गुरु द्यावा प्रसाद जी झडकरी॥ ध्रु०॥ वासुदेव दिंडीगाण। प्रसादमागें आले जाण॥ आणिक आले कोण कोण॥ नांवें ऐकावीं त्यांचीं॥ सद्गुरु०॥१॥ ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वाणी॥ मागूं आले चारी खाणी॥ लिहिणार पंडित ज्योतिषि आणि॥ थाटभाट आले ते॥ सद्गुरु०॥२॥ गोंधळ डफकर भेरवजोगी॥ बाळसंतोष आणि बैरागी॥ फकिर डंकुलता तो वेगीं॥ कानफाडा आला तो॥ स०॥३॥ अंध पंगुळ बहिरा मुका॥ कैकैस वरी मुंडा देखा॥ भाटकिन्नर जटिल ऐका॥ तिष्ठताती प्रसादा॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी झडकरी॥४॥ जंगम सराफ आणि गारुडी॥ वाघ्या मानभाव हात जोडी॥ सोनार सुत्या घडो घडी॥ नरवा पुढें नाचतसे॥ सद्गुरु०॥५॥ सारे मंडपीं आले असे॥ रावविनोदें बोलतसे॥ महारजोहार करीतसे॥ प्रसाद द्या द्या म्हणउनी॥ सद्गुरु०॥६॥ ऐसे अपार भक्त आले॥ प्रसाद देउनि तृप्त केले॥ मेघश्यामाचीं पाउलें॥ यदुविरवंदितसे कीं॥७॥ सद्गु०॥ वासुदेव॥ पद॥ गोविंदारामा हो॥ गोपाळारामा जी॥ ध्रु०॥ सद्गुरु देवाजीचे॥ आम्हीं पाय वंदिले जी॥ भवभयसंशयो हे॥ दुर्लक्ष छेदिले जी॥ अलक्ष लक्ष बाणें॥ संधान साधिलें जी॥ गोविंदारामा हो॥ गोपाळारामा जी॥१॥ त्या संतसज्जनांचीकसि सभा बैसली जी॥ दर्शनें आस बेडी तात्काळ तूटली जी॥ जीवकीं शिवकीं हे अशी भ्रांती फिटली जी॥ भावीका साधकांची गुरुमाय भेटली जी॥ गोविंदारामा०॥२॥ चिह्नांद्वैत देवा तुझें नाम चांगलें जी॥ गाईन टाळ घोळें मन माझें रंगलें जी॥ सांवळें रूपडें हो असें ध्यान लागलें जी॥ उद्भवें स्मरत तेव्हां अनंत भोगिले जी॥ गोविंदारामा०॥३॥ पद॥ गुरुनाथ निरंजन हो॥ अपरूप देखिलें जी॥ ध्रु०॥ पाहतां रूप तें बा॥ मायालोभ आटला जी॥ संसार बद्ध आशा॥ भवपाश तुटला जी॥ कल्पनाद्वैत कामा॥ तात्काळ आटली जी॥ गुरु०॥१॥ अहंता हि त्रिविध ताप॥ सर्व ही जाळिले जी॥ नेलेसे ब्रह्मभुवना॥ अक्षयें दाटलें जी॥ हा ब्रह्मरस प्याला॥ घोंटुनी पाजिला जी॥ विश्रांतीझा-

ढी तेणें ॥ जीवपणा मुकलोंजी ॥ गुरु० ॥ २ ॥ त्रिकुटावरी जातां ॥ श्रीहाट देखिलेंजी ॥ गोल्हाट औटपीठ ॥ पाहोनी त्यागिलें जी ॥ ब्रह्मरंध्र सहस्त्र दळीं ॥ एकमूर्त्त बैसली जी ॥ त्याहूनी परात्पर सहज त्या-हाळिलें जी ॥ गुरु० ॥ ३ ॥ रंगनाथ निज दाता ॥ त्यानें दान दीधलेंजी ॥ निर्भयें केलें तेणें द्वैतासीं मूकलोंजी ॥ गोपाळनाथ नामें ॥ स्वरूपीं आटलोंजी ॥ गुरु० ॥ ४ ॥ पद ॥ गोविंदा रामा हो गोपाळा रामाजी ॥ ध्रु० ॥ श्रीकृष्णा सोंगड्याचे ॥ आम्ही बाळ बागडे जी ॥ आनंदें गाऊं नाचूं परी पाहूं त्याकडे जी ॥ इंद्रियें गायी आसुन्या जातात दाहीं कडे जी ॥ अनुहात वेणु नादें वळी आपणाकडे हो ॥ गोविं० ॥ १ ॥ गोविंदमूर्त्ति भोंवते ॥ गोपाळ शोभती जी ॥ आहं सोहं द्रुम बरीनें करीं टाळी वाहतीजी ॥ सत्कीर्त्तीचा मेरें हो हरिवरी ढाळिती जी ॥ श्रीकृष्णामूर्त्ति वरुनी देहलोण उतरती हो ॥ गो० ॥ २ ॥ आनंद साथवानें ॥ ऐसा खेळ दाविला जी ॥ अहंकार कल्पनेसी ॥ संदुष्ट मारिलाजी ॥ निःसंग शस्त्र घातें ॥ भववृक्ष छेदिलेजी ॥ गणपती नाम नौके ॥ ठेउनी तारिले हो ॥ गोविंदा रामा हो गोपाळा रामाजी ॥ ३ ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी ॥ झडकरी० ॥ ध्रु० ॥ दिंडीगाणें ॥ पद ॥ जयजयबा नारायणा ॥ मायबाप तूं बंधु सज्जना ॥ काय वर्णूं बा तुझिया गुणा ॥ केलें दंडवत तुझ्या चरणा ॥ ज० ॥ १ ॥ येथें जन्मासी कोण कोण आले ॥ त्यानें आपुलें स्वहित काय केलें ॥ सत्य सद्गुरुला शरण गेले ॥ त्यांनीं येउनी स्वहीत केलें ॥ जय० ॥ २ ॥ एक जाणोनी नेणते झाले ॥ देहममतेसी विसरोनी गेले ॥ अवघे प्रपंच विलया नेले ॥ देहीं येऊनी शीणतोडियेले ॥ जय० ॥ ३ ॥ एक जाणोनी भोळा भाव ॥ भूतमात्र दाखविला देव ॥ आला चिद्घन स्वयमेव ॥ त्याचे चरण वंदी उद्धव ॥ जय० ॥ ४ ॥ ॥ पद ॥ माझ्या हरभऱ्या नारायणा ॥ तुझा भाजून केला चणा ॥ ध्रु० ॥ त्याला मेळऊन हळदी कालवणा ॥ त्याचे दोनचार फके मा-राना ॥ वर तांब्याभर पाणी कां प्याना ॥ १ ॥ दिंडीगाणें ॥ ऐकामाझें दिंडीगाणें ॥ गाणें गातों ज्याच्या सत्तेनें ॥ ज्याच्या तेजें सर्व देखणें ॥ द्वैत निरसोनी एक पाहाणें ॥ १ ॥ आजी जी जी जी ॥ ऐका माझें दिंडी

गाणें ॥ ध्रु० ॥ एक असोनि द्वैत भाविनी ॥ रज्जूवरी सर्प जेवीं भ्रांती ॥ स्त्री पुरुषाचें भान अर्पिती ॥ निर्धारितां व्यर्थ जालि निगुती ॥ अजीजी० ॥२॥ अखंड दंडायमान जे वृत्ति ॥ तेचि दिंडी धरिली हातीं ॥ अनुहततंतु वाजती ॥ सुखानंदें झालीसे तृप्ती ॥ अजी० ॥३॥ गाणें ऐकणें दोनी एक जालीं ॥ ऐका म्हणतां लाज वाटली ॥ मेघश्यामें एकात्मता केली ॥ यदुवीरा लालुरी केली ॥ अजी० ॥४॥ सद्गुरु द्यावाप्र० ॥ **ब्राह्मण ॥ पद ॥** चूडू चूडू चूडू यशोदा नल्ली ॥ ध्रु० ॥ चूडू अमानी येक डू वची नाडू ॥ पालु पेरगू वाडू तागी पोईनाडू आमा ॥ चुडू० ॥१॥ गोला वालदी कोंगू पटीनाडू ॥ गोपी कलनी मचकें आडू नाडू आमा ॥ चूडू० ॥२॥ यमुनकू मे मूलीलक पोंगा ॥ दोंगा कृष्णुडू गंगाकू वचीना डू भक्तुलमू मेमू शर्णू पोंगा आमा ॥ चु० ॥३॥ **पद ॥** पहागे पहागे पहा यशोदे बाई ॥ ध्रु० ॥ पहापहागे तुझा मुरारी ॥ दह्या दुधाची करितो चोरी ॥ राधिकेच्या झोंबुन पदरीं ॥ मागतो कुच दानगे ॥१॥ जात होतों यमुना तीरीं ॥ तिकडुन आला तुझा मुरारी ॥ दुष्टवचनें बोले हरी ॥ दास धरितो चरणगे ॥२॥ पहागे० ॥ **पद ॥** ब्राह्मण वंदावे वंदावे ॥ कदापि नानिंदावे ॥ ध्रु० ॥ नहुषें विप्र छळिलें ॥ त्याचें शरीर अजगर झालें ब्राह्मण वंदा० ॥१॥ सहज विनोद केला ॥ राजा परीक्षिती निमाला ॥ ब्राह्म० ॥२॥ सद्गुरु द्यावाप्र० ॥ ॥ **भाट ॥ बानी ॥** मेहेरबान सलाम, बडे बडे सेट सौदागर सावकार हावलदार स्रुभेदार राजरजवाडे राजकुमार भर सभामों गर्जत भाट, भाट गज घांट साजे घोडेपर थाट, थाट पीठपर जीन जडावके जडे है, आंगमो सरम ज्याम जरदपीला गलबीच मोतनकी माला ॥ आंगपर शाला दुशाला सीर पेचका झलाला । उपर चमक रही बाला रामराजा देनेवाला दातनको बोलबाला ब्रह्म भाट बखान बोला. थरकत घोडा भडकत निशान आठरा बरनके राज्य महाराज ॥ **कबित ॥** छोटे छोटे हात छोटे छोटे पाव छोटे छोटे बाल गोविंद कन्हय्या, नाग फना फन झुलरही पगरी पटको मुख चुंबन लियो तेल फुलेल बनेल उगलीपर टेक नचावत मय्या, सुनीत जसोदा माताकु धिगट धिगट धीनाचत कन्हय्या ॥ **कबित ॥** आ-

नेकी बाटकोन, जानेका घाटकोन, ब्रह्मका कपाट कोन, कहासे जीवआ-
या है॥ जीव कोन शिव कोन, शिवका स्वरूप कोन, माया कोन धरनी
कोन, धरनीकु धरेकोन सोवनमो ज्यागे कोन देहे ले भागे कोन वादछं-
द लागे कोन कोनमो कोन समाया हे, कहे निपट निरंजन इतना नहीं
बुझे तो झकमारन नरदेह पाया है॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी अउक०
जोशी ॥ भविष्य ऐका दादानुरे बाबानु ॥ ध्रु०॥ पंचविसांचा हा देहो
बा हा देहो ॥ साधन बंधन साधाहो बा साधाहो॥ धरून न दर्सा हा दे-
हो बा हा देहो ॥ भवि०॥१॥ आलें संचित फळासी बा फळासी॥ तो
नर नचे देहासी बा देहासी॥ तीन ग्रह तुज पाशीं बा तुजपाशीं॥ ने तुज
करतिल परदेशी बा, परदेशी॥ भवि०॥२॥ त्रिगुणपंचक विषयाचें बा
विषयाचें॥ थोरा थोरांला भय त्याचें बा भय त्याचें॥ दहाराशी हें बळ
त्याचें बा बळ त्याचें॥ अकरावें हें स्थळ त्याचें बा स्थळ त्याचें॥ भविष्य
ऐका०॥३॥ रात्रिसहित दिनमान बा दिनमान॥ आस्तील हे त्रिभुवन
बा त्रिभुवन॥ जरी तुज आपलें हित करणें बा हितकरणें॥ सद्गुरुचर-
ण दृढ धरणें बा दृढ धरणें॥ भवि०॥४॥ कडका मोठा होईल बा हो-
ईल॥ काळ जगातें खाईल बा खाईल॥ जळ स्थळ अवघे जाईल बा
जाईल॥ निवांत होउन राहील बा राहील॥ भविष्य ऐ०॥५॥ कृष्णा
रायाचा प्रभु जोशि बा प्रभु जोशी॥ सर्वहि वस्तु त्यापाशिं बा त्यापाशीं
॥ क्षणांत हिंडे त्रिभुवनासि बा भुवनासी॥ सुखभोगी मूळ मिरासि बा
मीरासी॥ भविष्य०॥६॥ होरा॥ यारे या जाग्यामध्यें ब्रह्मराक्षस नां-
दलो, त्या राक्षसानें पांच भूतें केलीं॥ पांचांपासून पंचवीस झालीं॥ तीं
एकेठायीं मिळालीं॥ तें ऐका गारायानों॥१॥ त्या पंचविस नीं देह धुं-
डिला॥ बाबाचा जीव तोंडिं घातिला॥ साधन करा तयाला पांच जि
नसांची झाडणी करागा॥ रा०॥१॥ आधीं झाडणी अन्नाची करा॥
दुसरी झाडणी मनपुरीची करा॥ तिसरी झाडणी स्नेहाची करा॥ हा ए-
कविचार बरा॥ सांगतों गारायानों॥३॥ चवथी झाडणी सुखशय्येची
करा॥ पंचक्रोशीं हा विचार बरा॥ त्रिवेणीचा संगम खरा॥ ने दबोल
तो गारायानों॥४॥ जोशी॥ पद॥ मी आलों रायाचा जोशी सत्य

मानिसी॥ध्रु०॥ कल्पना बायको शेजारीण॥ झगडा करी मोठा दारुण॥ तिच्यापायीं होईल नागवण॥ घरबुडविसी मी आलों०॥१॥ मनाजी पाटील देह गांवींचा॥ विश्वास धरूं नका तयाचा॥ घात होईल रे नेमाचा॥ सत्यमानसी॥ मी आलों०॥२॥ येथून पुढें वेरें होईल॥ भक्तिसखें दोंद वाढेल॥ बेडी कर्माची तुटेल॥ सत्य मानिसी॥ मी आ०॥३ पुढें काळ सन्निध गेला॥ माय धरीना लेंकराला॥ एका जनार्दनीं श्रोत्याला॥ झणीं विसरसी॥ मी आलों॥४॥ सद्गुरु द्यावा प्रसाद जी० ॥ ॥ तुंबडीवाला ॥ अचल एक निराकार मेरी तुंबडी भरदे मोहमायाका विस्तार मेरी तुंबडी भरदे जनीं ब्रह्माविष्णुरुद्र मेरी०॥ भये दश अवतार मे० छे दर्शनका पुन मेरी० एक बीजका विस्तार मेरी तुं०॥ ब्रह्मा करे अकार मेरी० बोले रामानंद लाल मेरी०॥ तुंबडी भरदे लाल तुंबडी भरदे०॥ सद्गुरु द्यावा प्रसा०॥ भुते॥ पद ॥ उदोग उदो बोला॥ सारा डोंगर गर्जलाग गर्जला॥ ध्रु०॥ दयाळ अंबाबाई॥ आइनें मंदिरीं जाब दिलाग जाब दिला॥ दिवस मावळला॥ कोंडन पुरीच्या लवयनींग लवयनीं॥ दयाळ अंबाबाइ आनंदें ये धाउनी ग, ये धाउनी॥ पद ॥ आई रेणुके मूळ माया सुंदरी॥ नांदते तुळजापुरीं जी॥ ध्रु०॥ आई कल्होळाची आंघोळ करी॥ जडिताचा टोपशिरीं॥ नाकीं मोती चकचक करी॥ गाय सुरवास जाय झडकरीग॥ आई रेणुके॥१॥ माझे दयाळ तुकाबाई॥ तुझें तुळजापुरीं ठाणें॥ धांवणें धांवलीस, केलें भक्तासाठीं येणें ग॥२॥ माझे दयाळ तुकाबाई॥ किती वर्णूं मी तुझी थोरीग॥ आपुल्या भक्तालागीं॥ पावशी परोपरी॥३॥ सद्गुरु द्यावा प्रसाद०॥ जंगम॥ पद ॥ आतळ गंगा पनाळ पाणी सीतळ होईरे जंगम्या॥ ध्रु०॥ सोनीयाचे झारीमध्यें गंगाजळ पाणी॥ आवडीनें पितां तूं सीतळ होईरे॥ जंगम्या॥ ॥१॥ बारा वर्षे पूर्ण जाहलीं तुमच्या अमच्या भेटीला॥ आज संधिशी गांठ पडली तूं सीतळ होईरे जंगम्या०॥ आत०॥२॥ पद ॥ तो एक जंगम हो जंगम हो॥ मूळ तीर्थीं ज्या संगम॥ ध्रु०॥ त्रिकुटावरी मठ केला॥ त्याचा द्वैतभाव निमाला॥ तो एक०॥१॥ निर्विकार मूळमा-

आ ॥ त्याला अक्षयी माळा गाआ ॥ नो एक० ॥ २ ॥ हेचि अंतरखुण दावी ॥ शांती भस्म कपाळीं लावी ॥ नो एक० ॥ ३ ॥ अक्षयभिक्षा मागे ॥ अखंड सद्गुरुभजनीं लागे ॥ नो एक० ॥ ४ ॥ शिवदिन त्याला आधीं ॥ अध्या म्हणुनी शरण साधी ॥ नो एक० ॥ ५ ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी झ० ॥ ॥ **आंधळा** ॥ धर्म जागो सद्गुरुचा ॥ जो का परोपकारी ॥ अंधळ्या दृष्टी देतो ॥ त्याचें नाम उच्चारी ॥ ध्रु० ॥ पूर्व जन्मीं पाप केलें ॥ तें बा अधीक विस्तारलें ॥ नाशिवंत विषय सुख ॥ सेवितां तिमिर कोंदलें ॥ चौऱ्यायशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें ॥ ज्ञान दृष्टी हारपली ॥ दोन्हीं नेत्र आंधळे ॥ धर्म० ॥ १ ॥ संसार दुःखमूळ ॥ चहूंकडे विंगळ ॥ विश्रांती नाहीं कोठें ॥ रात्रं दिवस तळमळ ॥ कामक्रोध लोभ शून्य ॥ पाठी लागले ओंगळ ॥ कवणा आतां शरण जाऊं ॥ दृष्टी देइल निर्मळ ॥ धर्म० ॥ २ ॥ **बहिरा** ॥ बहिरा मी झालों देवा ॥ तुझे गुण ना ऐकिले ॥ भवाचे प्रवाहीं, मी पडलों ऐसें झालें ॥ ध्रु० ॥ नें स्थान नाहीं होतें ॥ तयानें बुडविलें ॥ धांवबा पांडुरंगा ॥ दावीं संतांचीं पाउलें ॥ बहि० ॥ १ ॥ संतांसीं विनवितों तुह्मीं जातां पंढरीसी ॥ सांगा माझी विनवणी ॥ एवढी पांडुरंगासी ॥ बहिरा० ॥ २ ॥ बहिरा मज ऐसें करी ॥ नाइकें कोणाची निंदा ॥ दुसरें मज कांहीं नको ॥ लावीं रामनामीं सदां ॥ ब० ॥ ३ ॥ याचक मी हेंचि मागें ॥ देईं संतांची सेवा ॥ हेचि माझी प्रार्थना ॥ सांगा पंढरीच्या देवा ॥ खाकनाथ म्हणतसे ॥ विठ्ठल नाथापरी घ्यावा ॥ बहिरा मी० ॥ ४ ॥ सद्गुरु द्यावा प्र० ॥ **मुका** ॥ **पद** ॥ मुका मी झालों देवा ॥ केला प्रपंच हेवा ॥ बहु दोष आचरलों ॥ पूर्व जन्मींचा ठेवा ॥ ध्रु० ॥ मुकलों पूर्व स्थान ॥ स्वरूपाचें विंदान ॥ माझा मी आहें कवण ॥ हें नकळे विज्ञान ॥ संताच्या संगतीनें ॥ नाहीं आत्मनिवेदन ॥ गुरुकृपा मज व्हावी ॥ येवढें मागतों मी दान ॥ मुका मी० ॥ १ ॥ आतां मज वाचा देईं ॥ गुणवर्णीन मी कांहीं ॥ संतकृपा करतील ॥ तेंचि दाखवितो सोई ॥ याचक मी हेंचि मागें ॥ उदारा तूं दाता होईं ॥ नाहीं तरी सोडी बिरुदा ॥ जाईन आत्मघातासीं ॥ मुका मी० ॥ २ ॥ माई होऊन दुरमाई ॥ नको होऊं चा आतां ॥ अर्थ माझे एखावे ॥ तुजवीण कोण त्राता ॥ खाकनाथ हात ठेवी श्री मस्तका वरुता

॥विठ्ठलनाथा धन्य केलें॥ वैष्णवासरता॥ सुकामी ह्मा०॥३॥ द्यावा प्र-
साद०॥ **केकाडीण**॥ **पद**॥ केकाई केकाई दुरिल माझा देश॥अल-
क्षपूर नगर तेथें आम्हां रहिवास॥ सहज आह्मी बीज केलें शकुन सांगा-
यास॥सांगिजेल तेथें दादा धरिपाया विश्वास॥ध्रु०॥ प्रथमचिमी
तव दादा केकाडीण झालें॥जेथिंचें तेथिंचें येथें अवघें संचलें॥हो-
तां घडमोडी नाहीं स्वरूप कालवलें॥केका०॥१॥ काळाई गोराई आ-
ई नव्हे सांवळाई॥ मत्स्याई कूर्माई नव्हे वराई नरसाई॥वामनाई पर-
शाई नव्हे रामाई कृष्णाई॥ बौधाई कल्काई नव्हे शकुन सांगों काई
॥केकाई०॥२॥ दिसे तें तें भुरं दादा सांगों काय अंतीं, चंद्रसूर्य क्षणा-
माजी भुरं होउनी जाती॥चौदा मन्वंतरें दादा तीही भुरं होतीं॥पाहा-
तां अवघें दादा भुरं अनुभव प्रचीती॥केका०॥३॥ केकायी केकायी
ऐसें बोलनि घरोघरीं॥केकायी केकायी ऐसें कोणीं न विचारी॥ धनधा-
न्य पुत्र पौत्रीं हावि सोस भारी॥विषय लोभासाठीं दादा ठकल्या न-
रनारी॥केका०॥ सहज परिस दादा सांगेन हितगुज गोष्टी॥सांडूनि-
यां मायाजाळ राहें निजदृष्टी॥ सद्गुरुरूपें केशवराजी केकायीसीं भे-
टी॥ एकांतीं लोकांती पडली निजवस्तूशीं मिठी, केकायी०॥५॥ स-
द्गुरु द्यावा प्रसाद०॥ **गोंधळी**॥ **श्लोक**॥ प्रभो मोरया मोरयाना-
म तूझें॥ कृपासागरा हेंचि माहेर माझें॥ तुझी सोंड बा वांकुडी एक
दंता॥ मला बुद्धि दे मोरया गूणवंता॥ **गण**॥ गणराज गजानन गा-
वा हो॥ध्रु०॥ व्याळ वेष्टित दोंद विराजे, नाचत रंगणीं पाहावा हो १
आदिनारायण गणपती वरदे॥कीर्त्तनीं करी निज ठेवा हो॥२॥ **पद**॥
सुदिन सुवेळीं तुझा मांडिला गोंधळ हो॥ पंच प्राण दिवट्या दोन्हीं ने-
त्रांचे हिल्लाळ हो॥ध्रु०॥मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवनामाझारीं हो
॥ चौक साधियेला नाभीं कमळ ठेउनी वरी हो॥१॥ बैसली देवता पुढें
वैष्णवांचें गाणें हो॥ उदोकार गर्जती कंठीं तुळशीचीं भूषणें हो॥२॥
स्थावर जंगम तारी भुवनत्रय पंचाननी हो॥ आंबाखिली माता विठाबाई यो-
गेश्वरी हो॥३॥ तुसें तूज पावलें आतां नवस पुरवी माझा हो॥तुका-
म्हणे राखीं आपुल्या शरणागतालागीं हो॥४॥ सद्गुरु द्यावा प्रसा०

॥ गारुडी ॥ पद ॥ आदि पुरुष निर्गुण निराधारकूं याद कर ॥ मेरे परव-रदिगरकूं याद कर ॥ जिनें अजप माया बनाई उस वसतादकूं याद कर, संत महंतकूं याद कर, श्रीभगवंतकूं याद कर ॥ १ ॥ जोग जुगतका बांदु तो डा, समदम शिरपर समला छोडा, समताके सोसमका तुरा, गुरु गारोडी बीर पुरा ॥ २ ॥ नैनचरके प्रेरे निद्रा, कानफारके प्रेरे मुद्रा, अनुहात धनु बडा बाजे, नागसूरकी धनु गरजे, ॥ ३ ॥ चलचल चल चल, निरंजन जं-गलके जीवडे चल खेलना है तो उलट दृष्टिसें खेल, चुप करेगा बदफेल तेरी मुंडी काटेंगा ॥ ४ ॥ सापसब झले बीचु किडे, प्रपंच पेटारे में आन पडे, बडे बडे जनावर पाले, हारे जरदे उजले ॥ ५ ॥ काला पिला भलाबे भला, अभिमान का जोडा, झरमुद नुपुलडा, नैनतो काटने दवडा, दौ-रमीया दौरदौर दौर ॥ ६ ॥ हाय हाय हाय हाय, आबा बाबा बाबा बाबा, आला लाला लाला, आता ताता ता ता ॥ ७ ॥ हाय हाय, इंक मारारे मारा, भले भलेसेंने उतारा जद लगाये गुरुग्यानका म्होरा, जद जहेर उतारा ॥ ॥ ८ ॥ दिया खेल हांडी बाग, हांडी बाग बडा अलबेला, हातह लावे पां-व झलावे, भोले भोले लोक बुलावे ॥ ९ ॥ आजी हंडी बाग. आहाजी, बा-प बडा क्या बेटा बडा, नैजी बेटा बडा, बेटे आगे बाप खडा, गुरु बडा क्या चेला बडा, चेला बडा, चेले आगे गुरु खडा. धनी बडा क्या चाकर बडा, चाकर बडा, नैजी धनी आगे चाकर खडा, सास बडी क्या बोव बडी, बोहुके आगे सास खडी, बीबी बडी क्या बांदी बडी, बांदीके आगे बी बी खडी, लेकर निराधारकी छडी, बीबी कसम छातीपर चढी, तहीन-ही महीं नहीं, नाहीं नहीं, आळस छडा, नीभी अभंगकूं उडावूं, फूक मारूं तो ज्या ज्या ज्या ॥ १० ॥ ज्यां आवना नहीं नहीं ज्या, ज्यां जाना न हीं नाहीं ज्या, अनादनके झाड उपर ज्या, बोधके पहाड ऊपर ज्या, मे-रे सद्गुरु दाताकु शरण ज्या, मेरे गुरु दाताकी इतनी सोल करी, वो मुलमें न्रसें हातमें पकरी, फेर देखा तो मेरी मेरे पास ॥ ११ ॥ अबीक-रूंगा खबूतरका तमासा, बिन पंखसें उडावत हैं कैसा, देखे तो आवे देख, खली तेमें घुसा, आव बे आव बाहेर आव बाहेर आव, जी-से हात ना पाव, जीसे गांव ना गाव, जीसे नै रूप रेखा नांव, कछु बीन

ही, धीरे धीरेसे मंध बोलु, लिंगु देहकी गांठ खोलूं, मै ऐसा एकवार खेल खेलूकी, मेरे बडे बडे बडे नहीं खेले, अवल करूंगा येक, येक के करूं दो, दोके करूं तीन, तीनके करूं च्यार, चारके करूं पांच, पांचके करूं पंचवीस, पचीसके करूं छतीस, छतीसका करूं येक, येक नहीं तो येका जनार्दनीं देख ॥ १२ ॥ सद्गुरु घ्यावा० ॥ ॥ **जोहार** ॥ जोहार माय बाप जोहार, मी देह गांवींचा महार, पार्वतीच्या गळ्याचा हार, ईश्वराचा सर्व शृंगार, की जी माय बाप, ॥ १ ॥ सूद करून सांगतों सारें, पैसे टाका माझ्या धन्याचे, बाकी ठेऊं नका त्याचे, की जी माय बाप ॥ २ ॥ पेल हा मनाजी मोठा फितवे कर, यानें लाविला थोर घोर, आवर बुद्धाई आपला पोर, नाहीं तर धनी कोंपेल, की जी माय बा० ॥ ३ ॥ विकल्प जी शेटेसदाची घान, पाह्यालान आयुष्याची मान, जेव्हां तोंडावर बैसेल व्हान, तेव्हां डोळे पुसाल, कीजी माय बाप, ॥ ४ ॥ वासना इनें फितुर केला, घरचा भेद बाहेर नेला, हा विचार धन्यास जर कळला, धनी धरून नेईल, की जी मायबाप ॥ ५ ॥ तैसीच ही ममताई आवा, इनें लाविला उभा दावा, ती ओटिल हातापायांच्या सावा, मग थुंकाल कीं, माय बाप ॥ ६ ॥ निंदाई आवाचें तोंड मोठें, मागें मागें मोडी बोटें ॥ ज्यां म्हटलें कोण बोलती नेटें, हा दटकून कीजी मायबाप ॥ ७ ॥ आशा आवाचा खोटा चाळा, ज्यासी त्यासी घालिती डोळा, मागती नवनिताचा गोळा, परी अंती जड जाईल, जीमाय बाप ॥ ८ ॥ हा देह पाटलाचा गांव, पांच पंचविसाची वेगळाली च हाव ॥ आणखी पन्नासांचें नांव, घेउनका जी माय बाप ॥ ९ ॥ सद्गुरुघ्यावा० ॥ **वाघ्या, मुरळ्या** ॥ त्या त्या जेजुरी नगरांत ॥ कोन्या चंदनी महालांत ॥ ध्रु० ॥ म्हाळसा बाणाई भांडती ॥ ऐकुन मल्हारि हांसती ॥ एकुन येरीला बोलती ॥ बस माझ्या धाकल्या सवती ॥ त्या त्या जेजु० ॥ येळ कोट भे० ॥ **पद** ॥ आले मार्तंड मल्हारी भक्त केवारी ॥ घोड्यावर स्वार खंडा घेउन करी ॥ ध्रु० ॥ मणिमल्ल दैत्य माजला महा बळिवंत ॥ तो कडे पठारीं वास करी निश्चित ॥ आसपास बारा योजन फेरी घालीत ॥ गायी ब्राह्मण गवसून मारितसे त्वरित ॥ मणिमल्ल नांव

ऐकतां धासत भारी ॥ हरिहरा विनविती प्रजा अवघ्या नरनारी ॥ आले० १ संकट विष्णूसीं पडलें पाहे शोधून ॥ सांबानें केलें स्तवन आला धांवून ॥ मणिमल्ल दैत्य संहारा तुम्ही जाऊन ॥ त्याचा अंत तुमच्या हस्तें कराशवन ॥ ऐसें ऐकतांची सांबानें केली तयारी ॥ धांवण्या धांवला भक्तांचा कैवारी ॥ आले मार्तंड ॥ २ ॥ करून पिंवळा पोशाक पठाण वेष धरीला ॥ शिरीं पेंच मंदील वर तुरा खोंवीला ॥ घोड्याला कडकापटा जडाव जिन भिडला ॥ झुस्यावर कलगी पिंवळा सडका त्याला ॥ पायजमा अंगरखा शेला पिंवळा भरजरी ॥ मोत्याचि कंठी प्रभा फांकली वरी ॥ आले० ॥ ३ ॥ जाऊन गांठिला दैत्य युद्ध मांडिलें ॥ दैत्यांचें खंड विखंड करून टाकिलें ॥ खंडेराव नामाभिधान तेथुन पडलें ॥ दैत्यासी कड्याखालीं लोटून दिधलें ॥ म्हणुनी कडेपठार म्हणति सत्वरीं ॥ गांवांन मर्दीला म्हणनि नाम जेजुरी ॥ आले० ॥ ४ ॥ लोक जयजयकारें गर्जती आनंद झाला ॥ तेतिस कोटी देवांनीं पुष्पवर्षाव केला ॥ मणिमल्ल दैत्य मारीला आनंद झाला ॥ ऐसा ऐकून प्रताप राजा होळकर आला ॥ देवळासीं लाविलें काम केली तयारी ॥ नवलक्ष पायरी बांधुन कळसवरी ॥ सुमुहूर्तें सिंहासनीं देव स्थापिला ॥ खाक नाथ म्हणे मी भावें शरण त्याला ॥ आले० ॥ ५ ॥ **पद** ॥ बानु म्हाळसा दोघी भांडती पहाती सकळ शाई ॥ यांत कांहीं बरी गत नाहीं ॥ ध्रु० ॥ बानु म्हणे म्हाळसा किती तरी जातीवर जाणें ॥ तुला काय होतें सांगुन ॥ कल्पतरूच्या झाडाखालीं शिंप्यांस गांठी देणें ॥ तुला काय सांगूं शाहाणपण ॥ चाल ॥ रुशी येऊन पडली गळा ॥ लाविला लळा भुलविला राजा जी जी जी ॥ सवतीनें पाडली तूट केला लंपट ॥ मल्या माझा जी जी ॥ गांव ॥ तुझी ठाऊक अवघी कथा ऐक बाणाई ॥ धनगर तुझा पिता ऐक बाणाई ॥ बिरदेव तुझा चुलता ऐक बाणाई ॥ सदा अरण्यांत वसतो ऐक बाणाई ॥ गेला जन्म मेंढ्या वळतां ऐक बाणाई ॥ तोडा कठिण शद्ब बोलत काळजामधीं रुतली सुई ॥ यांत कांहीं बरि गत नाहीं ॥ १ ॥ सद्गुरु ध्या० ॥ **फकीर** ॥ दिन पांचकी है जिंदगी ॥ करले खुदाकी बंदगी ॥ नहीं तो बडी शिरमिंदगी ॥ गफलत छोड हुशार रहो ॥ १ ॥ जिनें आपकूं जोया नहीं ॥ तनम-

नसे खोया नहीं ॥ मनमल कु धोया नहीं ॥ आंघोल किया तो क्या हुवा ॥२॥ सवाल ॥ अल्लानें तुजकूं पैदा किया ॥ भला बुरा बतला दिया ॥ तूं पावेगा आपना किया ॥ गफलत छोड हुशार रहो ॥३॥ पद ॥ संतनके संग खाई चिद्रुदकी भंग सदा आवनमो दंग फकीर १ ऐसे मालंग फकीर ऐसे ॥ ध्रु० ॥ संतनके चरन झटे सब जंजाल काल तुटे ॥ त्रिभुवनका नाथ लुटे ॥ २ ॥ संतनकालि पादुमाल मेरा तुटा भव जंजाल ॥ कहतकेशव कंगाल ॥ ३ ॥ सद्गुरु द्या० ॥ बैरागी ॥ सची भई बैरागन दिलसे लगी लटक सीतारामकी ॥ सची० ॥ ध्रु० ॥ औरनसे कछु काम नहींहे ॥ ब्यह्नी माला काष्ठकी ॥ १ ॥ भालतिलक हे नचहत टोपी ॥ छोडी आस धन मालकी ॥ २ ॥ मध्वनाथजो रघुबरजीसे ॥ लगालगन्नहीं कछु बाकी ॥ ॥३ ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी झडकरी ॥ पद ॥ हा हा रमता जोगी रमता जोगी ॥ आयारे बाबू रमता जोगी ॥ ध्रु० ॥ कानोमें कुंडल बभूत लगावे ॥ गलबीच निर्गुण सेलीरे बाबू ॥ रमता० ॥ १ ॥ गौड बंगालासंत्र तुमारा ॥ नाथ भये गिरधारीरे बाबू ॥ रमता० ॥ २ ॥ कहत कबीरा सुन-भईसाधु ॥ अनुहानकीं गरीब जावेरे बाबु ॥ रमता जोगी आयारे ॥३ ॥ सद्गुरु द्यावा० ॥ शाहीर ॥ लाव० ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा ॥ ह्रदयीं वागावा ॥ ध्रु० ॥ ज्याचें पद पंकजरज स्मर संघें मस्तकीं धरावें ॥ ज्याच्या नतभक्तजनाच्या संगें भवताप सरावे ॥ ज्याणें सिंधुरासुरादिक भंगेरिपुगर्व तुरावे ॥ तो हा गणराज वरदमागावा रंगीं रंगावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक० ॥ १ ॥ शुंडा भुजदंडसु मंडित ज्याचे कुंडलें लटकती ॥ श्रवणीं रंगामध्यें तुंदिलनाचे पाउलें पटकती ॥ भुललेगण किन्नर गंधर्वांचे गायनीं अटकती ॥ ऐसा गजवदन काय सांगावा स्वमनीं लागावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा० ॥ हस्तीं वरपरशू मोदकांकुश हे शोभतात चारी ॥ माथां मणिमुकुटप्रवालुनि राहे दुर्वा उपचारीं ॥ अंगीं सर्वोत्तम रूपमा वाहे विद्यामृत चारी ॥ वाटे कविराय सदा भागावा तत्पदिं जागावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा ह्रदयीं वागावा ॥ ३ ॥ लावणी ॥ वंदे श्रीगजमुख मगजाबालं ॥ विधुस्कललितभालं ॥ ध्रु० ॥ चंडीस्तनमंडित शुंडादंडं

मदमर्दितगंडं ॥ सांगश्रीमंगलविभव करंडं ॥ कृतदितिकुलदंडं ॥ दूरी-कृतपदनतजनभवजालं ॥ विधुस्फ० ॥ १ ॥ गौरीपरमेश्वर कुतुकारामं ॥ कृतविघ्नविरामं ॥ कामंत्रिभुवनैकपूरितकामं ॥ स्फवरदमभिरामं ॥ शरणागत परिजन करुणाबालं ॥ विधुस्फललित० ॥ २ ॥ आद्यंविद्या-मृतपारावारं ॥ विधिजगदाधारं ॥ कंठालंबितमणिमुक्ताहारं ॥ श्रितसंपदगारं ॥ धीरंकविरायपिकैकरसालं ॥ वंदेश्रीग० ॥ ३ ॥ लावणी ॥ भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा ॥ धरिसि तरि हरिचा सेवक स्फधा ॥ ध्रु० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नराशिरावरि हरि ॥ जरातरि समज धरि अंतरीं ॥ हटातटानें पटारंगवुनि जटाधरिशिकांशिरीं ॥ मठाची उगा-ठेवकां तरी ॥ वनांत अथवा जनांत होकां मनांत भलत्यापरी ॥ हरिचें नाम भवांबुधितरी ॥ चाल ॥ काय गळ्यांत घालुनी तुळसीचीं लांकडें ॥ हींकाय भवाला दुरकरतिल माकडें ॥ बाहेरमिरविशी आंत हरिशिवाकडें ॥ अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा ॥ धरिसि तरिह-रिचा सेवकस्फधा ॥ १ ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला ज्याळ काम कोपला ॥ आंतुनि बाहेर म्हणविशी भला ॥ वित्त पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला ॥ असें हरि म्हणतो नुमजे तुला ॥ दांभिक वर संभाविल अभ्यंतरिं नाहींस बिंबला ॥ बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चाल ॥ तूं पोटासाठीं करि खटपट भलतिशीं ॥ परिभक्ति रसाविण हरि भेटेल काय तुशीं ॥ कायध्यानधरुनियां गोमुखिला जाळिशी ॥ स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला बुधा ॥ धरिशितरि० ॥ २ ॥ टिळा टोपिवर शिळा पडो या बिळांत करिशी जपा ॥ तथापिन होय हरिची कृपा ॥ दर्भमुष्टिच्या गर्भिं धरुनियां निर्भरपशुच्या वपा ॥ जाळिशी-तिळा तांदुळा तुपा ॥ दंडकमंडलुबंडमाजविशिमुंडमुंडिशी तपा ॥ नसार्थक लटक्या साऱ्या गपा ॥ चाल ॥ ही बारबार तलवार येइल काय पुन्हा ॥ ह्या दुर्लभ नरदेहांत ठेविशी कुन्हा ॥ भगवंत भ्रकेला भ्रीचा पाहुणा ॥ वर्म कळेना धर्म घडेना कर्मचित्त न हूधा ॥ सदाहरि कविरायावर फिदा ॥ ३ ॥ भला जन्म हा तुला लाधला० ॥ धरिशितरि ॥ भैरव जोशी ॥ सिद्धा जागतां जग जोगी रे जग जोगी रे सिद्धा-

जागता०॥ विश्वविभूतिल्याउनि अंगीं॥ अंगीरे बा॥ दुर्जेपण उरविलें जगीं ॥ अनुहात वाजती शिंगी॥१॥ ज्ञानवैराग्य उपरम जाणे॥ तोचि त्रिशूळ हातीं धरणें॥ कामक्रोध केलें छेदन॥ बोध डौर करीं घेऊन॥२॥ योगी नामरूपातीत॥ वर्णव्यक्ती भेदरहीत॥ मेघश्यामीं हाचि सिद्धांत॥ यदुवीरा तें विनें प्रास॥३॥ सद्गुरु०॥ बाळसंतोष॥ तुझे आंगींचा उतारा ॥ तो मज देईगा दातारा॥ तेणें न येमी संसारा॥ बाबा बाळसंतोष॥१॥ कायाकबाय टोपी दान॥ अहं देही शेला दान॥ मागत संतु जलागीन॥ बाबा०॥२॥ जितेंद्रियकरिं वेष्टन॥ समवदर्नी दे भोजन॥ पंचविषय देणें दान॥ बाबा०॥३॥ आशा साडी चोळी दई॥ तृष्णा घटी देगे बाई॥ नकरी अनुमान कांहीं॥ बाबा०॥ मेघश्यामचरणीं मन॥ ठेउनियां करणें दानें॥ यदुवीर करी दातपण॥ बाबा०॥५॥ सद्गुरु०॥ प्रसादाचें पद॥ तीर्थ चरणींचें शीतळ॥ गळां तुळशीची माळ॥ इतुकें झडकरी पाववें॥ नाहीं तरी बळिया होउनि राहावें॥ ध्रु०॥ चुवा चंदन केशराचा॥ विडा आपुले हातींचा॥ महा प्रसाद ताटींचा॥ विडा आपुले हातींचा॥२॥ विनवी जगमित्र नागा॥ विठोबा तें जाउनी सांगा॥३॥ असो याप्रमाणें वासुदेव, दिंडीगाण॥, अंध, बहिरे इत्यादि अनेकप्रकारचे याचक आले; परंतु प्रभूंनीं ज्यास जी इच्छा होती ती सर्व पूर्ण करून त्या सर्वांस कृतार्थ केलें. इतर दात्यांजवळ सर्व प्रकारच्या इच्छा पूर्ण व्हावयाच्या नाहींत. फार झालें तर द्रव्यसाध्य पदार्थ ते देतील. प्रभुरामचंद्र महाराजांच्या दरबारांत षड्गुणैश्वर्य ऋद्धि, सिद्धि, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे सर्व पदार्थ अखंड परिपूर्ण आहेत. जो ज्यावेळेस जें मागेल तें त्यास देऊन त्याची पुनर्याचना प्रभु उरूं देत नाहींत. याकरितां तुकाराम म्हणतात॥ ऐशा दात्या विसरावें॥ तोंडकोणा पसरावें॥४॥ आरती रामाची ॥ उत्कट साधुनि शीळा सेतू बांधूनी॥ लिंगदेह लंकापुर विध्वंसूनी॥ कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी॥ देह अहंभावें रावण निवटोनी॥ जयदेव जयदेव जय निजबोधा रामा॥ परमार्थी आरती परिपूर्ण कामा॥ ध्रु०॥ प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला॥ लंका दहन करुनी अखया मारीला॥ मारीला

जंबूमाळी भवनीं आहाटीला ॥ आनंदाची गूढी घेऊनी आला ॥ जय० ॥२॥ निजबळें निजशक्ती सोडविली सीता ॥ म्हणुनी येणें झालें अयोध्या रघुनाथा ॥ आनंदें ओसंडे वैराग्य भरता ॥ आरति घेउनि आली कौसल्या माता ॥ जयदेव० ॥ ३ ॥ अनुहातध्वनि गर्जति अपार ॥ अठरापद्में वानर करिती भुभःकार ॥ अयोध्येसी आले दशरथकुमर ॥ नगरी होत आहे आनंद थोर ॥ जयदे० ॥ ४ ॥ सहजसिंहासनीं राजा रघुवीर सोहंभावें तया पूजा उपचारा ॥ सहजाची आरती वाद्यांचा गजर ॥ माधवदासा स्वामी आठवे ना विसर ॥ जयदे० ॥ ५ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयें तत् ॥ १ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामकृष्णं भजे ॥ २ ॥ हरेराम हरेराम रामराम हरे हरे ॥ इति भजनं ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहरमहादेव ॥ जानकीजीवनस्मरण ॥ जयजयराम ॥ सबसंतनकी जय ॥ बालगोपालकी जय ॥ सद्गुरु महाराजकी जय ॥

समाप्त